३/बी/१०, निर्मल पार्क,
धनकवडी, पुणे ४११०४३
दूरध्वनी : ०२०-२४३७४६६६
मोबाईल : ९५४५०५५६७६

■ **प्रकाशक**
**वेदान्तश्री प्रकाशन**
१६७५/१, कृष्णलीला चेंबर्स,
सदाशिव पेठ, टिळक रोड,
एस. पी. कॉलेजसमोर,
पुणे - ४११ ०३०.
फोन : ०२०-२४४७८०८०
मोबाईल : ९७६४१५७०३५
vedantshreepublishing@gmail.com
Visit us at : www.bookganga.com

■ **प्रथमावृत्ती :** १२ फेब्रुवारी २०१७
■ **मुखपृष्ठ :** श्रीकृष्ण ढोरे
■ **अक्षरजुळवणी :** सौ. विनया कुलकर्णी, पुणे.
■ **सजावट :** शुभांगी एन्टरप्रायजेस, पुणे.
■ **मुद्रितशोधन :** राजेश हेन्द्रे
■ **मुद्रणस्थळ :** एस. अे. प्रिंटर्स, पुणे.
■ **मूल्य : ₹ १५०/-**
■ ISBN : 978-81-932246-9-4





रूपारेल कॉलेज माझं भावविश्व होतं.
१९५७-५८ हा तो कालखंड.
मित्र-मैत्रिणींचा घोळका
माझ्या सभोवताली होता.
आता मोजकेच मित्र संपर्कात आहेत.
बाकीचे कुठे आहेत, कसे आहेत
काहीच कळेनासं झालंय.
नुकतेच शाली परब आणि
अरुण प्रधान दोघे अनंताच्या यात्रेला निघून गेले.
त्यांच्या चिरस्मृतींना ही माझी भावांजली!



## स्वगत, आभार आणि अर्पण

अवकाळी अंधत्व आल्यामुळे काळोख माझा सखा झाला आहे. तसं पाहिलं तर अंधार डोळ्यांत पेरून जगणं कठीण आहे; पण ते मी स्वीकारलं आहे. काही लाजरे-बुजरे क्षण आणि चुटपुटणाऱ्या आठवणी मी मनात साठवल्या आहेत. त्या अधूनमधून डोकावतात आणि मला लिहिण्यास प्रेरित करतात. तशी माझी दोन अपत्यं. पहिला 'बायको' नावाचा काव्यसंग्रह आणि 'सूरबाला' हा माझा कथासंग्रह. एकदा वय वाढलं की मृत्यू आसपास आहे असा भास होतो. मृत्यू दुःखहर्ता आहे अशी माझ्या मनाची समजूत; म्हणूनच हा मृत्यू माझ्या कथानकांतून डोकावतो.

या कथासंग्रहात 'शाली' आणि 'दुबईची बेटी' या कथा सत्यघटनांवर आधारित आहेत. कथांमधील पात्रं जिवंत आणि माझ्या आपुलकीची आहेत. दुर्दैवाने काही दिवसांपूर्वी शालीचे निधन झाले. मरणापूर्वी ही कथा मी तिला ऐकवली होती. शाली काहीच बोलली नाही. जे काही बोलायचे होते ते तिचे आसू बोलले. शालीच्या चेहऱ्यावरचा गहिवर माझ्या मनात रुतून बसला आहे. मी शब्दांना आकार देतो. माझे ओठ बोलतात आणि समोर बसलेली व्यक्ती ते शब्द कागदावर साकारते, हा आमचा परिपाठ. कथासंग्रहाचे

संगणकलेखन सौ. विनया विनायक कुलकर्णी यांनी केले. त्यात अनेक फेरफार केले आणि ते तिने संयमाने स्वीकारले. मी तिचा सहृदय आभारी आहे.

साहित्याच्या चळवळीमधले एक उभरते नाव श्रीमती मंदा नाईक. नवोदितांना प्रोत्साहन देणे हा त्यांचा स्थायिभाव. त्यांचे आभार मी कोणत्या शब्दांत मानू मला कळेनासे झाले आहे. तूर्ततः मी चिंब नेत्राने पण नि:शब्द होऊन त्यांचे आभार मानतो. सौ. गीतांजली जोशी यांचं मन आकाशाइतकं मोठं. या आकाशात जेवढ्या चांदण्या आहेत, तितक्या त्यांनी मला शुभेच्छा दिल्या. मी ओंजळभर आसवांनी त्यांना धन्यवाद देतो.

**हा कथासंग्रह शालीच्या चिरस्मृतींना अर्पण!**

**– सुभाष मुरलीधर कर्णिक**





# प्रस्तावना

श्री. सुभाष कर्णिक हे संवेदनशील, सरळमार्गी आणि पापभीरू लेखक आहेत. 'सूरबाला' हा त्यांच्या कथांचा संग्रह त्यांच्या याच गुणांची प्रचिती देतो. अकाली दृष्टी हिरावून नियतीनं त्यांच्यावर अन्याय केला; पण त्यांनी तो धीरानं स्वीकारला आणि अंतःचक्षूच्या साहाय्यानं माणूसपणाचा शोध घेणं चालू ठेवलं. या शोधात त्यांना अनेक व्यक्तिमत्त्वं दिसतात, अनेक घटना–प्रसंग दिसतात. 'दिसतात' हा शब्दप्रयोग मी मुद्दाम केला आहे. कारण त्यांनी पाहिलेल्या किंवा अनुभवलेल्या अशा व्यक्तींकडे पाहण्याचा दृष्टिकोन हा केवळ त्यांचा स्वतःचा आहे. त्यामुळे साहजिकच त्यांच्या स्वतःच्या सरळमार्गी स्वभावाचा प्रभाव त्यांच्या पात्रांवरसुद्धा आहे.

'शाली' या कथेतली अगदी स्वच्छ, खमंग आणि थेट बोलणारी नायिका त्यांना सापडते. 'दुबईची बेटी'मधली इंदू, तिच्या वाट्याला आलेलं दुर्दैव त्यांच्या संवेदनशील मनाला हुरहुर लावतं आणि ती बेचैनी तितक्याच तीव्रतेनं वाचकांनीही अनुभवावी, अशी पोटतिडीक त्यांच्या लिखाणातून आपल्याला जाणवते. अशाच, यशोदा (कन्यादान), वैजयंती (हॅलो १९८) या नायिकाही ते आपल्यासमोर उभ्या करतात. या प्रवासात मग, एकमेकांना मदत करणाऱ्या;

पण परस्परांना न भेटण्याचं बंधन घालून घेणाऱ्या 'हॅलो १९८' च्या नायक-नायिकेची एक निरगाठही ते अलगद बांधून ठेवतात. (ती एकांकिका मी १९७२ च्या आसपास लिहिली होती) म्हणजे आम्हा दोघांच्याही मनात खदखदणारं रसायन एकच होतं. पण कर्णिकांनी कथेचा शेवट खूपच सोज्वळ केला आहे. कोणत्याही विषयाला सामोरं जाण्याचा त्यांचा हा स्वभावच आहे, असं वाटतं. हे सगळं चित्तवेधक आणि बांधून ठेवणारं आहे. सहृदय वाचक त्यात गुंतून पडेल. परंतु, आपल्या सर्वसामान्य जगण्याच्या आजूबाजूला असणारी साधीसाधी माणसंही खूप गुंतागुंतीची असतात. त्यांच्या स्वभावाला आणि वागण्याला एकापेक्षा अधिक स्तर असतात. माणसाच्या अगदी लहान पिल्लामध्येसुद्धा दुसऱ्याला ओरबाडण्याचा दुष्टपणा अंगभूत असतो. किंबहुना, यामुळेच ती 'माणसं असतात आणि मग त्यांच्या हकिकती जास्त उत्कंठावर्धक होतात, असं मला वाटतं. ज्ञानदेवांनी म्हटल्याप्रमाणे 'जो जो वांछिल तो ते लाहो' असं झालं तर गोष्टच निर्माण होणार नाही.

लेखकाच्या स्वभाववैशिष्ट्यांचा प्रभाव काही प्रमाणात त्याच्या लिखाणावरही पडत असतोच. ते साहजिकही आहे. परिणामी, कर्णिकांच्या कोणत्याही कथेत 'खलनायक' नाही! जे काही वाईटसाईट घडतं, त्याचा दोष नियतीच्या पदरात बांधून ते मोकळे होतात. मग अनेक वेळा अपघात होतात, व्यक्तिरेखांना आय.सी.यू.मध्ये राहावं लागतं, काहींच्या नशिबी तर कोमात जाणं येतं! म्हणजे लेखक पात्रांना दोषी ठरवण्यापेक्षा हतबल करून टाकतो. कारण असा दुष्टावा मुळात लेखकाच्या विचारातच नाही. उत्कृष्ट खलनायक रंगवणारा लेखक स्वतःच दुष्ट असतो, असं नक्कीच नाही; पण असा मुक्तविचार (Wild Thinking) लेखकाच्या स्वभावात असायला हवा, असं मी सुचवीन.

श्री. कर्णिकांची कथा नेमकी कशी आहे? या प्रश्नाचं उत्तर त्यांनी प्रस्तावनेत स्पष्टपणे सांगितलं आहे. ते म्हणतात, 'अवकाळी अंधत्व आल्यामुळे काळोख माझा सखा झाला आहे. तसं पाहिलं तर अंधार डोळ्यांत पेरून जगणं कठीण आहे, पण ते मी स्वीकारलं आहे. काही लाजरे-बुजरे क्षण आणि चुटपुटणाऱ्या आठवणी मी मनात साठवल्या आहेत. त्या अधूनमधून डोकावतात आणि मला लिहिण्यास प्रेरित करतात.'

हे कथाविश्व इतकं वैयक्तिक आहे. एका कथेत त्यांची नायिका कुलस्वामिनीचा धावा करते. ती कुलस्वामिनी एकवीरादेवी आहे. माझ्या कल्पनेप्रमाणे कर्णिकांची कुलस्वामिनीदेखील एकवीरादेवीच असावी! किंवा



त्यांच्या 'शाली' कथेचा नायक खूप वर्षे इंदूर शहरात राहिलेला आहे. तसंच लेखकानंदेखील बराच काळ हिंदी भाषिक प्रदेशात वास्तव्य केलेलं आहे. त्या वास्तव्याचा परिणाम त्यांच्या भाषेवरही जाणवतो. कारण त्यांच्या लेखनात - 'महकत' होती, 'थोपलं' गेलं, जीवनाचा 'बोझ', 'नौबत' आली होती..., असे शब्दप्रयोग सहजपणे येत राहतात. थोडक्यात, कर्णिक आपला चष्मा वाचकांना देतात. तो वाचकाला मानवला की तो कर्णिकांच्या कथासृष्टीमध्ये सहज रममाण होऊ शकतो.

कर्णिकांच्याच 'बायको' नावाच्या कवितासंग्रहातील ही 'अक्षर' नावाची कविता आहे-

**तू होतीस एक अक्षर**
**मीही होतो एक अक्षर**
**होते अंतर आपल्यामधी**
**नव्हता अर्थ काही**
**आपल्या नात्याला**
**त्या दुराव्याला**
**मग आपण दोघे**
**अचानक भेटलो**
**जवळ आलो**
**हातात हात घेऊन**
**उभे राहिलो**
**शब्द बनलो**
**तेव्हा तुझ्यातला तू**
**माझ्यातला मी**
**आपण गमावून बसलो**
**ये प्रिये ये**
**समीप अशीच रहा**
**आपण दोघे**
**नव्याने शोधू या**
**अर्थ नव्या नात्याचा**
**त्या अक्षर युगुलाचा**
**साज आणि सूर**

**यांच्या मीलनात**
**नव्या मनोबंधनाचा!**

बस्! कवितेत जी दोन अक्षरं आहेत, त्याऐवजी दोन व्यक्तिमत्त्वं, म्हणजे नायक आणि नायिका उभी करायची. मग जे नव्या मनोबंधनाविषयी घडतं तेच त्यांच्या कथांमधून दृष्टोपत्तीस येत राहतं. एक गोष्ट मात्र नक्की, श्री. कर्णिक यांच्या कथालेखनात एक आश्वासन आहे. ते वाचकांपर्यंत सहजपणे पोहोचू शकतात. आता त्यांनी थांबू नये. 'सूरबाला' ही 'सुरुवात' ठरावी. त्यासाठी त्यांना अनंत शुभेच्छा!

**श्रीनिवास भणगे**



# अनुक्रमणिका

## शाली

मी शालीला फोन लावला.

'हॅलो शाली, अग मी सुभाष कर्णिक बोलतोय. ओळखलेस का मला?'

'अरे शनिदेवा, तू जिवंत आहेस अजुनी?'

'ए नको ना तू मला त्या नावानी हाक मारूस.'

'हे बघ. तुझ्या डोक्यावर थापलेले सव्वा मण तेल, कपाळावरून नाकाच्या शेंड्यावर ओघळणारा शेंदूर आणि तुझा तो ऐतिहासिक निळा टी शर्ट. तुझ्यासारखा नमुना साऱ्या रूपारेल कॉलेजमध्ये नव्हता.'

शालीच्या आठवणींना दाद द्यायला हवी. जवळजवळ तीस वर्षांनी मी तिला फोन केला. आपल्या आठवणी किती स्वच्छंदपणे तिने जपल्या होत्या.

'बरं, काय रे मेल्या, तू इतके दिवस तोंड कुठे काळं केलं होतंस?'

'अग मी नोकरीनिमित्ताने इंदूरला होतो. आता रिटायर्डमेंट आलीय ना, म्हणून मुंबईला बदली करून घेतली.'

'मला एक सांग, माझा नंबर तुला कुणी दिला?'

'अग तो शिवाजी काटकर आठवतोय का? तो मला शिवाजी पार्कवर भेटला. त्याने मला दिला.'

'कोण रे शिवाजी काटकर? हं. हं आठवलं, तो दादा कोंडके ना?'

'दादा कोंडके!'

'ज्याच्या पायजम्याची नाडी लटकताना दिसायची तोच ना?

'हो. हो....'

च्यायला! तो काय टेलिफोन डिरेक्टरी आहे का जासूस?

'ते मला माहीत नाही. शालीच्या तोंडात 'अगोबाई, अय्या' अशा नाजूक शब्दांना थारा नव्हता. ती मुंबईची 'आयला, च्यायला' अशी टिपीकल भाषा होती. खरंच किती बिनधास्त होती तेव्हा! आजही तशीच होती. मैत्रीची वीण तिने किती जपून ठेवली होती ती.

बोलता बोलता मी शालीला म्हणालो, 'बरं का ग शालू...'

शाली कडाडली, 'काय रे गधड्या, तुला त्या नावानी हाक मारण्याचा अधिकार कुणी दिला? तो अधिकार फक्त सुधीचा आहे.'

'म्हणजे तुझी ती मैत्रीण सुधा भाटवडेकर ना? सतरावेळा भांडायची आणि सतरावेळा गोडीगुलाबी करायची.'

'ए सुधी म्हणजे 'ती' नाही 'तो' आहे.'

'मला समजलं नाही. अरे सुधी म्हणजे सुधीर. माझ्या मंगळसूत्रातला तन्मणी. माझा सप्तपदीचा पार्टनर. कळलं?'

शाली सुधीला एकेरी नावाने संबोधत होती. खरंच एकेरी संबोधनात किती जिव्हाळा असतो. एक विलक्षण नावाचा गोडवा!

मला आठवतंय. मी लग्नानंतर हनिमूनला गेलो होतो. एकांतात मी पत्नीला म्हणालो, 'ए, मला एकदा एकेरी नावाने हाक मार ना! पण नाही. पती हा परमेश्वर आहे. त्याला अहो, जे' आणि मी तिला 'अग' म्हणत संसार केला.'

बोलण्याच्या ओघात शालीने मला विचारले,'काय रे तू लग्न केलंस की नाही?'

'ए अग तू असं का विचारतेस?'

'नाही रे, तू मारुती आणि शनी या दोघांचा परमभक्त. अशा माणसांमध्ये विरक्ती ठासून भरलेली असते. म्हणून विचारले.'

'ए मी असा तसा नाही. मी आता दोन नातवंडांचा आजोबा आहे.'

'काय म्हणतोस! हा अद्वैत का चमत्कार? बरं जाऊ दे. तुझी बायको कुठली रे?'

'अग आपल्या वर्गात ती कुंदा गुप्ते होती ना....'

'ओह नो. कसं शक्य आहे ते? शी वॉज सो ब्युटीफुल!'



'अग शाले शाले, तू माझ्या वाक्याची मान मध्येच मुरगळतेस. मला म्हणायचं होतं, त्या कुंदा गुप्तेच्या चुलतबहिणीशी माझे लग्न झाले.'

'हं, हं, मग ठीक आहे.'

कुठल्याही सुंदर मुलीशी माझं लग्न होऊच शकत नाही, असं शालीला का वाटत होतं देव जाणे. आमच्या गप्पांना ऊत आला होता. मी म्हणालो, 'बरं का ग शाली, मागच्या आठवड्यात मी तुला क्रॉफर्ड मार्केटमध्ये पाहिलं होतं. तुझ्याबरोबर तुझे मिस्टर असावेत.'

'मागच्या आठवड्यात – माझ्याबरोबर जी व्यक्ती होती तिचे वर्णन कर पाहू.'

आता या बयेला माझ्या तोंडून तिच्या पतिदेवांचं वर्णन ऐकण्याची काय हुक्की आली होती, हे परमेश्वराला ठाऊक. मी आवंढा गिळून म्हणालो, 'मध्यम बांधा, निमगोरा (त्याला काळा म्हणण्याचं साहस माझ्यात नव्हतं), चक्क टक्कल पडण्याच्या मार्गावर असताना मी सहानुभूतीने म्हणालो, थोडेसे विरळ केस.'

'ए येड्या, तो सुधी नव्हता. वडापाव होता.'

'वडापाव?'

'अरे आपल्या वर्गातला अरुण कुलकर्णी होता. काय झालं माहिती आहे का? तो मला क्रॉफर्ड मार्केटच्या बसस्टॉपवर दिसला. मी त्याला म्हणाले, 'मी गाडी आणली आहे; तुला घरापर्यंत लिफ्ट देईन.' पठ्ठा खूश झाला. बसचे पैसे वाचले ना! पण एक सांगू का तुला सुभाष, अरुणला स्त्री–दाक्षिण्य सॉलीड. माझ्या सगळ्या वजनी पिशव्या त्याने धरल्या होत्या,

फोन ठेवता ठेवता शाली म्हणाली, 'बरं का रे सुभाष, तू नं माझ्या घरी ये. हो, येताना तुझ्या त्या बिच्चाऱ्या बायकोला घेऊन ये.'

'तिला बिच्चारी का म्हणतेस?'

'चुकलं माझं. तुझ्याशी लग्न केलेल्या त्या वीरांगनेला घेऊन ये. झालं समाधान?' शालीने फोन ठेवला.

शाली रूपारेलमध्ये माझ्या वर्गात होती. एक भारदस्त व्यक्तिमत्त्व. शहामृगासारखी डौलदार चाल. शाली हॉकीची खेळाडू होती. लोक जसे पॉमेरियन कुत्र्याला जवळ बाळगतात नं तशी शाली हॉकीस्टिक बाळगायची. त्यामुळे कॉलेजात शालीची कोणी छेड काढली, असं कानांवर कधीच नाही आलं.

शाली जेव्हा मैदानावर उतरायची तेव्हा बघ्यांची गर्दी खूप व्हायची. शाली

मुलांसारखे तोकडे कपडे घालून सुसाट धावायची. बाकीच्या काकूमुली साडीचा खोचा घेऊन गजगतीने धावायच्या.

एक दिवस मी माहिमला शालीच्या घरी गेलो. शालीनेच दरवाजा उघडला. 'ए व्हॉट ए सरप्राईज! ये... ये... तू किती रे बदललायस!' शालीने माझे मनापासून स्वागत केले.

परळला चाळीत राहणारी शाली परब आता मात्र 'अरब' झाली होती. तो भव्य दिवाणखाना, झुलणारी झुंबरं, भव्यकाय सोफे आणि पायाला गुद्गुदल्या करणारे गालिचे. माझ्या अंगठा तुटलेल्या चपलांना अवघडल्यासारखं झालं.

शालीने कोपऱ्यात काही पुतळे उभे केले होते. लहानपणी मास्तर आपल्याला बाकावर उभे करायचे नं तसे. शालीचा तो इंपोर्टेड थाट पाहून मला माझ्या गावठीपणाची लाज वाटली.

तेवढ्यात सुधी तिथे आला. शालीने माझी ओळख करून दिली.

'हा माझा एकदम जवळचा मित्र. माझ्या वर्गातला. आम्ही धम्माल केली. खूप खूप मज्जा केली. हो की नाही रे सुभाष?'

मी सकारात्मक मुंडी हलवली.

हे वाक्य वरचेवर सभ्य वाटलं तरी ते खोचक अर्थाने भरले आहे. ऐकणाऱ्याच्या मनात नको तेव्हा अनेक पाली एकाच वेळी चुकचुकतात.

तो शालीचा सौजन्य सप्ताह असावा; अन्यथा इतक्या शालीनतेने माझी ओळख सुधीशी कशी करून दिली, याचं मला आश्चर्य वाटलं. दुसऱ्या क्षणी शाली सुधीला म्हणाली, 'ए सुधी, तू आता इथून फूट. आम्हाला खूप गप्पा मारायच्यात. उगाच कबाब में हड्डी नको.'

मला एक कळत नव्हतं, माझ्या आणि शालीच्यामध्ये सुधी हड्डी कसा होऊ शकतो?

सुधी शालीला म्हणाला, 'अगं मी निघालोय. कबुतरीचा फोन आला तर सांग मी दहा मिनिटांत पोहोचतोय.' मग मला सुधी म्हणाला, 'ठीक आहे. रंगू द्या तुमच्या गप्पा. ऑल दि बेस्ट.'

सुधी गेल्यावर मी शालीला विचारलं, 'काय ग शाले, ही कबुतरी कोण?'

'अरे ती त्याची खास मैत्रीण. त्याच्याच ऑफिसमध्ये होती. एकेकाळी सुधीवर मरायची. मागेपुढे गुटूर गुटूर करायची. म्हणून तिचे नाव मी कबुतरी ठेवलं.'

'पण, अग अजूनही त्यांचं....'

'नाही. तसं काही नाही..... आता त्यांच्यात निखळ मैत्री आहे. कबुतरीचं लग्न झालंय. खरं सांगू का सुभाष, सुधीसारखा नवरा मिळायला भाग्य लागतं. आमचा संसार नजर लागावा इतका सुंदर आहे. सुधी अतिशय सालस आहे रे.'

शालीचा सुधीवरचा विश्वास. संसाराची स्वप्नं फुलवणारी एकमेकांची सोबत. खरंच किती भाग्यवान ही शाली!

जरा वेळाने शालीची सूनबाई दीपाली आली आणि शालीला म्हणाली, 'आई, तुझ्या नवीन मित्राला काय आणू?'

'अग हा नवीन कुठला. हा तर मेला जुनाट आहे. तू आपल्या बागेतलं गवत आणलंस तरी हा प्रेमाने खाईल. दीपा, बेटा याचे चरणस्पर्श करून आशीर्वाद घे.'

दीपालीने वाकून नमस्कार केला. शालीचा आणि सुनेचा संवाद ऐकून माझा चेहरा फिकटला. नेमकं ते शालीने हेरलं. म्हणाली, 'तुला आमचं बोलणं ऐकून आश्चर्य वाटलं असेल नं?'

'हे बघ. ती मला आई म्हणते, तेव्हा मीच तिला म्हणाले मला अगं आई म्हण. तुला अगं आई आणि अहो मधला फरक कळतो का?' 'अगं'मध्ये जिव्हाळा आहे, जवळीक आहे. 'अहो'मध्ये भीतीयुक्त आदर आणि काहीसा दुरावा.'

'बरं का रे सुभाष' मला आशिष झाल्यानंतर मी देवाला विनवणी केली, मला एक मुलगी दे. नवस, उपास सगळं काही केलं; पण त्यानं नाही माझं ऐकलं.

'जेव्हा दीपाली लग्न होऊन या घरात आली तेव्हा माझी अपुरी स्वप्न तिच्यात पाहिली. मागच्या जन्मी ही माझी मुलगी होती,' अशी मनाची समजूत पण काढली!

कधी कधी नं सुभाष, दिपू मला म्हणते, 'ए आई, आज मला तुझ्या मांडीवर झोपायचंय.'

'ती माझ्या मांडीवर शांत डोकं ठेवून झोपते. मिटल्या पापण्यात एखादं सुंदर स्वप्न पाहातेय असा भास होतो. कधी ओठांवर स्मित हास्य तर कधी गालखळीचे विलोभनीय दर्शन.

'तिचा निरागस चेहरा पाहून मी सुखावते. तिच्या रेशमी केसांतून हात फिरवत मी अंगाई म्हणते. ही अंगाई माझी आई मी लहान होते तेव्हा म्हणायची.'

शालीचं ते भावविश्व किती मनोहर होतं, भावनांच्या बहरवेलींनी बहरलेलं, स्पर्श गंधात गंधलेलं. तिचा मातृभाव पाहून मी गलबलून गेलो.

तिच्यातल्या त्या आईला मी मनोमन नमस्कार केला.

बराच वेळ झाला. निरोपाची वेळ आली.

शाली म्हणाली, 'जरा थांब.' ती आतून एक साडी घेऊन आली. 'आज जर तू वहिनींना घेऊन आला असतास तर त्यांची खणा-नारळाने ओटी भरली असती. त्या कशा आहेत रे दिसायला? त्यांना पाहण्याची मला खूप इच्छा झाली आहे. या साडीचा रंग त्यांच्यावर खुलून दिसेल, अशी मी आशा करते.'

'शाले, नात्याची तू इतकी सुंदर वीण गुंफतेस. युगायुगांची नाती जोडतेस. मला अग आणि अहो यातला फरक समजावून सांगितलास. मग आज तू तुझ्या वहिनीला अहो म्हणून का दूर लोटलंस?'

'चुकलं माझं. खरंच चुकलं.' शालीच्या डोळ्यांत टचकन पाणी आलं. शालीने दारात उभं राहून मला निरोप दिला. मी जिना उतरत होतो. मी मागे वळून नाही पाहिले. शालीला हुंदका अनावर झाला होता.

■



# दुबईची बेटी

दिवाळीच्या सुट्टीत आम्ही दुबईला गेलो होतो. दुबईला सार्वजनिक दिवाळी नसते; पण घरोघरी साजरी केली जाते. तो दिवाळीचा पहिलाच दिवस होता. अकराचा सुमार असावा. कुणीतरी आमच्या घराची बेल वाजवली. त्या वेळी मीच दार उघडले. माझ्यासमोर एक मध्यमवयीन, गौरवर्णी, बोलक्या डोळ्यांची युवती उभी होती. काहीशी झुकून आदाब करीत म्हणाली,

'आप दादाजी बम्बई से पधारे है । वेलकम टू द स्टेट ऑफ दुबई' मी विचार केला, माझ्याविषयी इतकी इत्थंभूत माहिती ठेवणारी ही बया कोण? तेवढ्यात माझ्या दोन नाती खिदळत आल्या आणि 'इंदूमावशी आली' असं म्हणत किंचाळल्या. एक जिव्हाळ्यात भिजलेलं नातं मी पाहिलं.

'ए मावशी, आधी रिंगा रिंगा' मुली म्हणाल्या.

मग त्या तिघींनी फेर धरला आणि नाचू लागल्या. हिश्या, हुश्या, ऑल फॉल डाऊन म्हणत अक्षरशः जमिनीवर धपकन बसत होत्या. माझ्या चिमण्यांचे ते निरागस हसणं, इंदूचं लहान मुलांसारखं वागणं हे पाहून मी गलबलून गेलो.

मुलींचा गोंधळ ऐकून माझी सून किचनमधून बाहेर आली व म्हणाली, 'मुलींनो ऐका, आज तुमची इंदूमावशी खास आजोबांना भेटायला आली आहे. तेव्हा नो रिंगा, झिंगा, पिंगा कळलं?'

मुली नाराज झाल्या आणि इंदू जिथे जाऊन बसली तिथे जाऊन दोन्ही बाजूला बिलगल्या. वसंतवनात एखादी हरिणी दोन पिल्लांसह दिसावी असा भास झाला. आमच्या गप्पांचा सेशन सुरू झाला. हो एक सांगायचं राहून गेलं, इंदूने आमच्यासाठी खास गुजराती मिठाई करून आणली होती.

इंदू मला म्हणाली, 'दादाजी, तुम्ही मला तुमच्याबद्दल काहीच सांगू नका. शिखाने तुमच्याविषयी सर्व काही सांगितलंय. शिखा तुम्हाला बाबा म्हणते ना? पण आमच्या गुजराती लोकांमध्ये वडिलांना बापू म्हणतात. मी तुम्हाला बापू म्हटलं तर चालेल?'

'चालेल नाही धावेल. मला आवडेल ते बेटा.'

'शिखा म्हणते तेच खरं.'

'काय म्हणते शिखा?'

'आमचे बाबा नाती जोडण्यात पटाईत आहेत. बघा न क्षणाचाही विलंब न करता तुम्ही मला 'बेटा' म्हटलंत आणि युगायुगाचं नातं जोडलंत. पण एक सांगू तुम्हाला बापू, कधी कधी जन्मभर एकत्र राहूनही साधी तोंडओळख पण होत नाही.'

इंदूच्या त्या वाक्याचा काहीतरी गहन अर्थ होता. पण त्याचा संदर्भ माझ्या लक्षात आला नाही. मग अघळपघळ गप्पा सुरू झाल्या. इंदूच्या बोलण्यात विलक्षण जादू होती. कुणालाही आपलंसं करून घेण्याची कला तिला साध्य होती. वेळ कुठे निघून गेला कळलंच नाही. गप्पा संपल्या. 'आवजो बापू' म्हणत इंदूने निरोप घेतला.

इंदू निघून गेल्यावर मी शिखाला म्हणालो, 'काय ग, हा हास्याचा नायगारा तुला दुबईत सापडला तरी कुठे?'

'बाबा ज्याला तुम्ही नायगारा म्हणताय ना तो इंदूचा मुखवटा आहे. त्याच्यामागे लपलेली इंदू अत्यंत दुःखी आहे.'

'काय म्हणतेस हे तू?'

'बाबा, काय सांगू तुम्हाला इंदूची कर्मकहाणी. इंदूचा जन्म काठीयावाडच्या एका गावात झाला. इंदू पाच वर्षांची असताना तिच्या



वडिलांना देवाज्ञा झाली. त्यानंतर इंदूचं आणि धाकट्या दोन भावंडांचं पालन-पोषण तिच्या आईनी केलं, काबाडकष्ट केले. घरात अठरा विशे दारिद्र्य होतं; पण एकमेकांत घट्ट नातं पण होतं.

बघता बघता इंदू दहावीत गेली. इंदू उफाड्या बांध्याची होती. खेळात, अभ्यासात खूप हुशार होती. इंदूला शिकून खूप मोठं व्हायचं होतं. आपल्या ओढगस्त कुटुंबाला त्यातून बाहेर काढायचं होतं; पण ते नियतीला मात्र मान्य नव्हतं. इंदूच्या वडिलांचे जीवश्चकंठश्च मित्र जामनगरला राहात होते. त्यांनी इंदूला आपल्या मुलासाठी लग्नाची मागणी घातली. इंदूने आकांडतांडव केलं, आक्रोश केला. लग्न नकोय म्हणून आईपुढे परत परत हात जोडले. आई तिच्या मतावर ठाम होती. ते घराणं ओळखीचं होतं. शिवाय ते लोक इंदूला नेसल्या वस्त्रानिशी स्वीकारायला तयार होते.

मग एक दिवस इंदूच्या मनाविरुद्ध तिचं लग्न महेन्द्रशी झालं. महेन्द्र खूप चांगला मुलगा होता. इंदूच्याच वयाचा होता तो. इंदूवर अतोनात प्रेम करायचा. त्याच्या प्रेमाच्या वर्षावात इंदू चिंब चिंब झाली होती. दोघांनी आपली स्वप्ननगरी सजवली होती; पण ते सुख नियतीला नाही पाहावलं. महेन्द्रला वरचेवर ताप येत होता. एकदा चार दिवस तो फणफणला, काळा निळा पडला. तिथल्या डॉक्टरांनी महेन्द्रला अहमदाबादच्या मोठ्या इस्पितळात नेण्याचा सल्ला दिला. महेन्द्रला अहमदाबादला सिव्हिल इस्पितळात भरती करण्यात आलं. तिथे दैवानं इंदूच्या कोवळ्या मनावर प्रहार केला.

महेन्द्रच्या रक्ताच्या तपासण्या झाल्या. महेन्द्रला रक्ताचा कर्करोग झाला होता. इंदूचं भावविश्व अंधारलं गेलं. आजकालच्या प्रथेप्रमाणे डॉक्टरांनी महेन्द्रला आजाराचं गांभीर्य समजावून सांगितलं. महेन्द्र हताश झाला. इंदूला म्हणाला,

'इंदूराणी मला क्षमा कर. मला कल्पना नव्हती की अशा असाध्य रोगाने मला वेढलंय. मी तुला नाही फसवलं ग. मला किंचितशी कल्पना असती ना तर मी तुझ्याशी लग्न केलंच नसतं. या कोवळ्या वयात तुला वैधव्याची भेट नसती दिली. बाबा, इंदू पार खचून गेली होती. महेन्द्रला उसना धीर देत होती. महेन्द्र आसवांच्या थारोळ्यात इंदूला म्हणाला,

'मला आज तुझ्याकडून वचन हवंय.'

'कसलं?'

'माझ्या पश्चात तू दुसरं लग्न करशील. तसं नाही केलंस तर माझा आत्मा तडफडेल.'

'तू नको रे असं अमंगल बोलूस. हे बघ महेन्द्र, माझा माझ्या कुंकवावर आणि मंगळसूत्रावर पूर्ण विश्वास आहे. तू लवकर बरा होशील. तू नवकार मंत्राचा जप कर. तुझं मनोबल वाढेल. भगवान महावीर दयाळू आहेत. ते आपल्याला संकटातून बाहेर काढतील.'

इंदू स्वतःचेच सांत्वन करून घेत होती. दुर्दैवाने त्याच रात्री महेन्द्रची प्रकृती खालावली. डॉक्टरांनी शर्थीचे प्रयत्न केले. महेन्द्र कोमात गेला होता तो पहाटेस शुद्धीवर आला. महेन्द्र शुद्धीवर येताच म्हणाला,

'इंदू ही सकाळ आहे का संध्याकाळ?'

'आता नुकतंच उजाडलंय. तुला पक्ष्यांची चिवचिव ऐकू येतेय? पक्षी संगीतात बोलतात. त्या संगीतात माणसाला बरं करण्याची विलक्षण जादू आहे.'

'इंदू, अग माझ्या डोळ्यांसमोर अंधारी आलीय. तिथून कोणीतरी मला बोलवतंय. मला खूप भीती वाटतेय. मला तुला सोडून नाही ग जायचंय.'

महेन्द्रने इंदूचा हात आपल्या छातीशी घट्ट धरून ठेवला. हाताची पकड हळूहळू सैल हात गेली, श्वास मंदावला. महेन्द्रचे शेवटचे शब्द कानांवर आले. 'जय जिनेंद्र इंदू.' त्याला काहीतरी आणखी बोलायचं होतं; पण शब्द ओठात अडखळले. बाबा, इंदू तिथेच मूर्च्छित झाली. शुद्धीवर आली तेव्हा महेन्द्रची महायात्रा सुरू झाली होती. इंदूचं मंगळसूत्र तिच्या गळ्यातून कुणीतरी काढून घेतलं होतं. इंदूचं दुःख तिच्या कोवळ्या वयाला सोसणं कठीण होतं.

महेन्द्रचे अंत्यसंस्कार बारा दिवस चालले. तेराव्या दिवशी सासरकडच्यांनी पांढऱ्या पायाची म्हणून इंदूच्या कपाळावर शिक्का मारून तिला माहेरचा रस्ता दाखवला. इंदूने महेन्द्रची आठवण म्हणून जामनगरची चिमूटभर माती आपल्या पदरात बांधली. ती एसटीत बसली. खिडकीबाहेर आकाशात महेन्द्र कुठे दिसतोय का ते पाहत अश्रू ढाळीत होती. इंदू घरी आली. ती दिसताच आईने हंबरडा फोडला.

'बेटा मला क्षमा कर. तुझ्या या परिस्थितीला मीच कारणीभूत आहे. माझी



मती मारली गेली होती गं पोरी. माझ्या या सुंदर कळीला उमलण्याआधी मीच कुस्करून टाकलं. देव मला कधी माफ नाही करणार.'

'माँ तुम्ही नका वाईट वाटून घेऊ.' इंदू आईच्या कुशीत जाऊन म्हणाली.

'ते माझं प्रारब्ध होतं. प्रारब्ध बदलणं कुठल्याही मानवाला शक्य असतं का? मी इथे आता आले ना, तुम्ही नका काळजी करू. माँ मी तुमच्यावर ओझे नाही होणार. माझ्या भावंडांना मी आधार देईन. माँ मला फिनिक्स पक्ष्यासारखी भरारी घ्यायची आहे. माझ्या पंखांना तुमच्या आशीर्वादाचं बळ हवंय. 'इंदू डोळे पुसत म्हणाली.

बघता बघता वर्षभराचा काळ लोटला. या दिवसांत इंदूला विचित्र अनुभूती आली. तिच्या भावांच्या नजरेत परकेपणा जाणवत होता. मायेचा ओलावा आटल्यासारखा. ती रक्ताची नाती इतक्या लवकर रंग बदलतील याची कल्पना इंदूला नव्हती. ती एकटी पडली. त्यादरम्यान हरीशचं प्रपोजल इंदूला सांगून आलं. हरीश इंदूच्या वयाच्या जवळ जवळ दुप्पट होता, पण दुबईला नोकरी करत होता. बाबा, दुबईला नोकरी म्हणजे चंगळवाद असं कुठेतरी समीकरण लिहून ठेवलं असावं.

महेन्द्रच्या अस्थी थंडावल्या नव्हत्या. परत लग्नाचा सारीपाट, इंदू गोंधळली. एका बाजूला भावंडांच्या नजरेतला तिरकसपणा आणि दुसऱ्या बाजूला महेन्द्रने घेतलेलं वचन या संघर्षात इंदू फसली. विचारांती इंदूने स्वतःला नियतीच्या स्वाधीन करायचं ठरवलं.

मग एक दिवस इंदू हरीशची विवाहिता बनून दुबईला आली. परत नवीन स्वप्न पाहत जगायचं नियतीच्या हातातलं एक बाहुलं बनून. पाच वर्षांचा काळ निघून गेला. दरम्यान इंदू दोनदा मातृत्वाकडे झुकली. आधी अंकुर झाला, मग स्नेहा.

'अग त्यांचा पाच वर्षांचा संसार सुरळीत चाललाय ना, मग तिला दुःख कसलं?' मी शिखाला विचारलं.

'बाबा, इंदू मानसिक तणावाखाली जगते आहे. दुबईला आल्यावर तिला कळलं. हरीशची आर्थिक परिस्थिती डावाडोल आहे. त्यात दोन मुलांची भर पडली. बाबा हरीश आणि इंदूचं लग्न शारीरिक तडजोड होती. खरं सांगायचं तर इंदू महेन्द्रच्या स्मृतिकोषातून कधीच बाहेर आली नाही. तिने तन हरीशला अन् मन महेन्द्रकडेच ठेवलं होतं.

बाबा ही गोष्ट सांगायला मला लाज वाटते. इंदूने हरीशला मनापासून कधीच स्वीकारलं नाही. ते नातं आपल्यावर लादलंय असा समज करून घेतला. इंदू म्हणते हरीशच्या स्पर्शात वासना उफाळून येतात. त्याच्या स्पर्शात राकटपणा आहे. कदाचित तो वयोपरत्वे आला असेल. बाबा इंदू मला एकदा म्हणाली, मी जेव्हा हरीशच्या बाहूत असते ना तेव्हा मला महेन्द्रची प्रकर्षाने आठवण येते. त्याचा तो नाजूक कोवळा स्पर्श मी नाही विसरू शकले. हरीशच्या बेडरूममध्ये मी खचून जाते, थंडगार पडते. नेमकं तेच हरीशला आवडत नाही. मग तो चिडतो, बेभान होतो.

एक दिवस तिने मला असं पण विचारलं, 'बेडरूममध्ये महेन्द्रचा विचार करणं पाप आहे का ग?'

मी म्हणाले, 'नसेल कदाचित; पण तू भूतकाळात का गुंततेस? हरीश तुझा वर्तमान आहे का विसरतेस?'

बाबा ही आहे इंदूची कहाणी.

इंदूची कहाणी मनाला चटका लावून गेली. तिची भावनिक गुंतागुंत सहज सुटण्यासारखी नव्हती, बिच्चारी इंदू. आम्ही दुबईला जवळ जवळ दोन महिने होतो. इंदू अधूनमधून येत होती. गप्पा रंगत होत्या. आम्हाला हसवून ती जात होती. आमचं जिव्हाळ्याचं नातं घट्ट होत गेलं.

आम्ही मुंबईला निघालो त्याच्या आदल्या दिवसाची ही कथा. दुपारचे साडेचार वाजले होते. इंदू आमच्या घरी धापा टाकीत आली. डोळे रडून रडून सुजलेले, ओठ फिकटलेले, चेहरा मलीन आणि ओढलेला. आमच्या छातीत धस्स झालं! मी तिला सोफ्यावर माझ्या शेजारी बसायला सांगितलं. पण ती माझ्या पायाशी जमिनीवर बसली. शिखाने तिला विचारलं,

'इंदूबेन सूँ थयूँ?'

इंदूच्या तोंडून शब्द फुटेना. शेवटी मी तिच्या पाठीवर हात फिरवून म्हणालो,

'बेटा बोल ना काहीतरी. तुझ्या गप्प बसण्याने माझं काळीज गलबललंय.'

'बापू काय सांगू तुम्हाला? मी आता तिसऱ्यांदा आई होणार आहे.'

'अग मग त्यात वावगं काय आहे?'

'बापू कसं सांगू तुम्हाला. या मुलाला जन्म द्यायचा म्हणजे माझ्या अंकुर आणि स्नेहाच्या घासातून घास काढायचा. एक नवीन जीव पोसायचा म्हटलं तर आर्थिक ओढाताण खूप होईल. बापू या मुलाला माझ्या छातीशी कवटाळून पाजायचं म्हटलं तर माझ्या शरीरात नाही हो ताकद उरली.

'बापू मी हरीशला म्हणाले हे मूल आपल्याला नकोय. आपण गर्भपात करून घेऊ. हरीश ऐकायला अजिबात तयार नाही. काल रात्री आमच्या दोघात वादावादी झाली. हरीशचं डोकं फिरलं. त्याने मला गुरासारखं बडव बडव बडवलं. यापूर्वीही तो माझ्यावर हात उगारत होता. पण काल त्याने कहरच केला. माझी दोन्ही बाळं कोपऱ्यात उभी राहून थरथर कापत होती. 'डॅडी नका हो मम्मीला मारू' म्हणून विनवीत होती. त्यांचा केविलवाणा चेहरा पाहवत नव्हता. त्यांचे अश्रू पाहून त्याला नाही हो दया आली. बापू काल आमच्या तिघांच्या पोटात अन्नाचा कण नाही गेला. हरीश कुठल्यातरी पार्टीला जाऊन पिऊन आला होता. माझी दोन्ही पोरं उपाशीच मला बिलगून झोपली. स्नेहा तर अधूनमधून घाबरून, दचकून उठत होती. रात्रभर माझ्या डोळ्यांस डोळा लागला नाही. स्नेहाचं अंग थोडंसं तापलंय.'

'बापू मी काय करू सुचेनासं झालंय.'

'काय सांगू मी तुला बाळा? तू गर्भपात केलास तर हरीशचा रोष ओढून घेतेस आणि न केलास तर येणाऱ्या जिवाला न्याय देता येत नाही म्हणून खंत वाटते. खरं सांगू? हा निर्णय हरीशच्या संगनमतानेच घे. त्यातच तुझं भलं आहे.'

बोलता बोलता माझ्या अश्रूंचे दोन-चार थेंब इंदूच्या चेहऱ्यावर पडले. इंदूने वर पाहिलं.

'बापू तुम्ही नका वाईट वाटून घेऊ. तुमच्या आसवांत मला माझं उत्तर मिळालं, मी निघते आता. हरीश येण्याची वेळ झाली आहे. स्नेहाकडे लक्ष दे असं अंकुरला मी सांगून आलेय.'

'अग स्नेहा आजारी असताना तू इथे कशाला आलीस?'

'बापू तुम्ही उद्या इंडियाला जाणार. परत कधी भेट होईल सांगता येत नाही. माझ्याकडे माझ्या जन्मदात्याची पुसट ओळखपण नाही. तुम्ही इतक्या वर्षांनी भेटलात. तेव्हा तुमच्या चरणांवर माथे टेकण्यासाठी आले. बापू मला काही नकोय. तुमच्या हृदयात थोडीशी जागा हवी आहे. तुम्ही नाही ना विसरणार या दुबईच्या बेटीला?'

'नको ग असं काही बोलूस. तुला विसरायचं म्हटलं तरी ते शक्य होणार नाही.'

इंदूने माझ्या पायांवर डोकं ठेवलं. एखाद्या लहान मुलासारखी विव्हळत रडली. माझे पाय तिच्या आसवांनी ओलेचिंब झाले. मी तिला उठवलं.

'येते बापू, हरीश येण्याची वेळ झाली आहे. स्नेहाकडे लक्ष द्यायला अंकुरला सांगून आले.'

इंदू निघाली, थोडी दूर गेली, तेव्हा मी हाक मारली 'इंदू बाळा' तिने मागे वळून पाहिलं. तिचा अश्रूंत थपथपलेला चेहरा मी पाहिला आणि माझे डोळे घट्ट मिटून घेतले. डोळे उघडले तेव्हा इंदू नजरेपार झाली होती. माझी दुबईची बेटी!

■



## कन्यादान

वडखळ नाका सोडला की चिपळूणला रस्ता फुटतो. रस्त्याच्या दोन्ही बाजूला निसर्ग फुललेला दिसतो. लाल मातीचा सुगंध. उंच उंच डोलणाऱ्या पोफळी. मधेच कुठेतरी रहाटाच्या आवाजाची किरकिर आणि शिंपणातून झुळझुळणारा पाण्याचा आवाज.

वशिष्ठ नदीच्या तीरावर वसलेलं लोटे परशुराम गाव. शिवमंदिर प्राचीन आणि सुंदर. गावात एक मोठं प्रस्थ होतं वासूअण्णा गुर्जर.

वासूअण्णा म्हणजे गावचा सावकार. भरपूर शेती. आंबा, पोफळी, नारळ यांनी बहरलेली वाडी. नोकरचाकर दिमतीला. एक सुखवस्तू कुटुंब! छोट्याशा कुटुंबात पत्नी कमला आणि तीन मुली. गोदू, सुशी आणि चिंगी. गोदू पंधरा तर चिंगी आठ वर्षांची. नाही म्हणायला एकच खंत होती, मुलगा नव्हता.. ! वंशवेल खुंटली होती. सगळीच सुखं कुठे सगळ्यांच्या नशिबी येतात?

एक दिवस मधेच कमला साथ सोडून गेली. टॉयफॉइडचं निमित्त झालं. औषधोपचार केले; पण यश नाही आलं. शेवटी परशुरामाची इच्छा .. !

वासूअण्णा एकटा पडला. तीन मुलींची जबाबदारी सांभाळताना तो

हवालदिल झाला. मनाचा रिक्तपणा त्याला भेडसावत होता. शिवाय गोदू लग्नाची झाली होती. शाळा सोडून बसली होती.

काय मुलींसाठी मी दुसरं लग्न करायला हवं? एक विचार वासूअण्णाच्या मनात डोकावला ...

कण्हेरी गावातल्या पालकर मास्तरांकडून कर्जाची परतफेड बऱ्याच दिवसांत झाली नाही. वासूअण्णा चिंतित होता. निरोप पाठवले; पण मास्तर आले नाहीत.

शेवटी एक दिवस वासूअण्णा स्वत:च मास्तरांकडे गेला. त्याला पाहताच मास्तरांचा चेहरा पांढराफटक पडला.

मास्तर रिटायर्ड होते. त्यांनी वासूअण्णाचे यथायोग्य स्वागत केले.

'मास्तर, कसं काय चाललंय?'

वासूअण्णांनी विषयाला हात घातला.

'काय सांगू तुम्हाला? अडचणींवर अडचणी कोसळल्यात.'

'मास्तर कर्जापोटी गेले दोन वर्षांत एक पैसापण आला नाही'.

'हो मला कल्पना आहे'.

'मग मी काय करावं, अशी तुमची अपेक्षा आहे?'

'थोडं थांबावं'

'किती?'

'वर्ष-सहा महिने'

'ते शक्य नाही'

'वासूअण्णा! माझी परिस्थिती बिकट आहे. वाडीचं उत्पन्न खालावलंय. घरात उपासमार चालू आहे. दोन वेळेचं अन्न शिजणं दुरापास्त झालंय. लहान लहान मुलींना ना धड कपडा आहे ना अन्न. आबाळ चालली आहे. कधी तरी वाटतं नदीत जाऊन जीव द्यावा.'

' मास्तर जीव देऊन प्रश्न सुटत नाहीत. उलटे वाढतात. काय हो जीव दिल्यानंतर पोरांच्या हातात काय भिकेसाठी करवंट्या देणार आहात?'

बोलणं मधेच थांबलं. यशोदा चहा घेऊन आली. यशोदा म्हणजे मास्तरांची मोठी मुलगी, पहिल्या बायकोची. उफाड्याचा बांधा, रंग चिट्टा गोरा. गोड पण त्रासलेला चेहरा. यशोदाने चहा ठेवला आणि निघून गेली.

'मास्तर तुम्ही असं करा, रविवारी माझ्या वाडीवर या, तिथेच काय ते बोलू. वासूअण्णांनी चहा घेतला आणि निरोपसुद्धा ...

मास्तर वासूअण्णाच्या घरी आले. वासूअण्णा त्यांना माडीवरच्या खोलीत घेऊन गेला. वाड्याच्या चौकात मुली लंगडी लंगडी खेळत होत्या. 'मास्तर' वासूअण्णा म्हणाला, 'हे पहा मास्तर, कर्जाची रक्कम खूप वाढलीय. तुमच्या वाडीचं उत्पन्न इतकं नाही त्याचं व्याजपण देता येईल असं!'

'तुम्ही माझी वाडी घ्या. मी कुठेतरी निघून जाईन'

'मास्तर हा पलायनवाद आहे.'

'दुसरा इलाज पण नाही.'

'इलाज आहे.'

'काय?'

'तुम्ही तुमच्या यशोदेचा हात माझ्या हातात द्या.'

'काय ... ?'

'होय मास्तर ... कमला जाऊन सहा-सात महिने झाले. माझ्या मुलींवरची मायेची सावली दुरावली.'

'अहो पण माझी मुलगी तुमच्या मुलीसारखी. हे असं तुम्हाला बोलवतं तरी कसं?' मास्तर घामाने डबडबले.

'मास्तर मी तुम्हाला बळजबरी करीत नाही. हा केवळ प्रस्ताव आहे. प्रश्न आमच्या वयातल्या अंतराचा. मी तुम्हाला एवढंच सांगू इच्छितो, मला माझ्या या अवाढव्य इस्टेटीला वारस हवाय.'

'पण ती अजून सज्ञान पण झाली नाही.'

'मास्तर तुम्ही माझं दोन मिनिटं ऐकून घ्या. मी त्यांना वयस्कर आई आणू इच्छित नाही. मुली सावत्र आईच्या नावानी थरकापतात. आमच्याच नात्यातल्या एका मुलीनं, संगीता नाव होतं तिचं, सावत्र आईच्या जाचाला कंटाळून जीव दिला. तो पण आमच्याच बावडीत. तिचं फुगलेलं प्रेत मुलींनी पाहिलं. अजूनही त्या झोपेमधून कधी कधी दचकून उठतात. यशोदा त्यांना आईच्या रूपात मैत्रीण मिळेल.'

'अहो पण ... '

'मास्तर माझं बोलणं अजून संपलं नाही. मी तुमचं कर्ज माफ करीन. शिवाय माळावरची एक वाडी बक्षीसपत्रानी तुमच्या नावे करीन. त्यायोगे तुम्हाला आमदानी होईल. उपासमार टळेल. तुमच्या मुलांचं भवितव्य

सुधारेल. मी ही केलेली भले तडजोड समजा. पुढे तुमची मर्जी...'

मास्तर डोळे पुशीत उठले आणि म्हणाले, 'घरी चर्चा करतो. मग काय ते कळवतो.'

'अवश्य'

मास्तर विषण्ण परिस्थितीत परतले. आपल्या मुलीचा बळी देण्याचा त्यांना काय अधिकार होता? पण नशिबाचे फासे सगळेच उलटे सुलटे पडलेत. यशूच्या भाग्यात काय आहे, कोण जाणे?

रात्री मास्तरांनी पत्नीला आणि यशोदेला सर्व वृत्तान्त सांगितला. त्यांचे डोळे परत परत भरून येत होते.

यशू दिग्मूढ झाली. बाबा वारंवार त्यागाची गोष्ट का करतात? माझ्या भावनांचा बळी देऊन माझ्या भावंडाचं का भलं करत आहेत? 'हे बघ,' आई म्हणाली, 'यशोदा बाळा, आपल्यावर ओढवलेलं संकट दुर्धर आहे. त्याला सामोर जाणं कठीण आहे. ह्यांची दैना पाहवत नाही. ते पार थकलेत ग. सतत जीव देण्याच्या गोष्टी करतात. जर तू नाही म्हणालीस तर आम्ही बेघर होऊ, देशोधडीस लागू. मी या दारिद्र्याला कंटाळलेय ग. ही ओढाताण, ही उपासमार नाही सहन होत. आमची कीव कर. मी तुझ्यापुढे पदर पसरते.'

यशोदा स्थितप्रज्ञ झाली. प्रत्येक क्षण युगासारखा वाटत होता.

मनाचा हिय्या करून म्हणाली, 'पण बाबा तो प्रथमेश ..?'

'अहो त्या ब्राह्मण आळीतल्या लिमयांचा भाचा' यशूची आई मधेच म्हणाली.

'त्याचा इथं काय संबंध?'

'बाबा आमचं प्रेम आहे' यशोदा आवंढा गिळून म्हणाली.

'काय करतो तो?'

'रिक्षा चालवतो. पुण्यात असतो. खूप मेहनत करतो. कसलंही व्यसन नाही.'

'वाह! काय आमचं नशीब आहे! जावईबापू काय करतात तर म्हणे रिक्षा चालवतात.'

'बाबा, व्यवसाय कुठलाच वाईट नसतो, असं तुम्हीच म्हणत होता ना?'

'माझेच शब्द माझ्या घशात घालू नकोस.'

'बाबा, तो मेहनती आहे. आईवडील नसूनही तो मामा-मामीवर तितकेच



प्रेम करतो. त्यांचा चरितार्थ चालवतो. माणुसकी जपतो. आणिक काय हवे?'

'पण हे वय तुझं प्रेम करण्याचं आहे का?'

'पण हे लग्नाचं तरी कुठेय?'

'हे बघ यशू, तू स्वत:चाच विचार करतेस, कुटुंबाचा नाही. मी जन्मदाता आहे. पण तुझ्यावर सक्ती करणार नाही. तुझा निर्णय तूच घे. मला दोन-तीन दिवसांनी काय ते सांग.'

यशोदा रात्रभर जागी होती. विचारांच्या कल्लोळांनी त्रासली होती.

आपल्या जन्मदात्या पित्याने हात जोडावे. शी शी!... किती शरमेची गोष्ट आहे!

ही आई मला सापत्नभावाने वागवणारी, वेळप्रसंगी उपाशी ठेवणारी माझ्याकडे भावंडांच्या सुखाची भीक मागतेय.

बाबा परिस्थितीपुढे दुर्बल ठरले. सुख-चैन त्यांच्या आसपास पण फिरकली नाही. उपासमार सहन करून माझ्या पाठीवर प्रेमानी हात फिरवला. त्या स्पर्शाचा मला विसर का पडला? बाबांना मी एकांतात रडताना कित्येकदा पाहिलंय. ते बोलत नव्हते. त्यांची आसवे त्यांच्यासारखीच मूक होती.

मी कुटुंबासाठी त्याग करीन. प्रथमेशचं काय, त्याला दुसरी चांगली बायको मिळेल. त्यागातच खरं प्रेम असतं.

माझ्याशी लग्न करून वासूअण्णा उपकारच करत आहेत. तिने नकळत उपकारकर्त्याला हात जोडले. पहाटेस तिचा तनिक डोळा लागला.

सकाळी उठून यशोदा म्हणाली, 'बाबा त्यांना आपला होकार कळवा.'

मास्तरांनी डबडबलेल्या डोळ्यांनी यशोदेकडे पाहिलं. ती त्यांच्या कुशीत शिरली. छातीवर डोकं ठेवून ढसाढसा रडली.

'पोरी मी जाणतो ग तुझ्या भावना. तुझ्या कोवळ्या मनावर मी आघात करतोय.'

'बाबा, हा माझा होकार स्वखुशीचा आहे' मास्तरांनी तिचा माथा चुंबून तिला घट्ट छातीशी आवळून धरलं.

यशोदा एका रात्रीत प्रौढ झाली होती. भावनांच्या यज्ञात तिने स्वप्नांची आहुती दिली.

वासूअण्णांना होकार कळवला.

वासूअण्णांनी आपल्या मुलींना बोलावलं. आपला मनोदय सांगितला. हा

विचार ऐकताच त्यांचा थरकाप झाला. चिंगीच्या डोळ्यांसमोर संगीताताईचे प्रेत आले.

'बाबा, आम्हाला सावत्र आई नकोय. ती आम्हाला मारेल. उपाशी ठेवेल. मग आम्ही पण विहिरीत जीव देऊ.'

'ए वेडाबाई, असं बोलायचं नाही. ती आई ना खूप चांगली आहे. ती तुझे लाड करेल. छान छान खाऊ देईल. रात्री तुला जवळ घेऊन झोपेल.'

'तरी पण ती मला नको आहे'

इतका वेळ गोदू गुपचूप होती. गहिरा श्वास घेऊन म्हणाली, 'बाबा यशोदा माझ्या वर्गात होती. फी न भरल्यामुळे तिचे नाव शाळेतून काढून टाकलं. तिला मी आई म्हणून स्वीकारू? हा तुम्हाला व्याभिचार नाही वाटत?'

'गोदे, मला एक सांग. तुमची सगळ्यांची लग्नं झाल्यावर माझं काय होणार? या जगात मी एकटा पडेन.'

'बाबा, आम्ही तिघी आहोत. आळीपाळीने खुशाल येऊन रहा.'

'जावयाच्या दारात एखाद्या उपऱ्यासारखं?'

'बाबा जावई हा मुलासारखाच असतो ना?'

'नाही गोदे मला स्वतःचा मुलगा हवाय. वंश हवाय.

'बाबा यशोदचं वय काय? तुमचं वय काय? तुमच्या बोलण्याची मला किळस येतेय!

'गोदे, तुझ्या मर्यादा सोडून तू बोलतेस.'

'बाबा मी सांगितलं तर तुम्ही एक ऐकाल?'

'माझा निर्णय अटळ आहे. याव्यतिरिक्त काय सांगायचं असेल तर सांग.'

'माझं लग्न पण तुमच्याच वयाच्या एखाद्या बिजवराशी करून द्या.'

'मूर्खासारखं काही बोलू नकोस.'

वासूअण्णा अस्वस्थ होता. डोक्यात विचारांचे थैमान होते. मुलींचा विरोध आणि वंश वाढविण्याची प्रबळ इच्छा यांच्या संघर्षात तो फसला होता. त्याने तात्याला निरोप पाठवला. वासूअण्णाचा तात्या म्हणजे, तात्या ताम्हाणे. जीवश्चकंठश्च मित्र. सडेतोड बोलणारा, तोंडाळ.

'काय रे भटा एखादं कर्ज बुडलं की काय? का एखादा खटला हरलास?'

'तसं काहीच झालं नाही. मला एका गंभीर विषयावर बोलायचं आहे.'



'मग बोल की लेका.'

'मी लग्न करतोय.'

'अर्धी लाकडं स्मशानात गेल्यावर? एखादी लेकुरवाळी विधवा फसली की काय?'

'विधवा नाही कुमारिका आहे.'

'कोणाची बुद्धी मारली गेली?'

'कण्हेरीच्या मास्तरांची. यशोदा नाव आहे तिचं.'

'काय वय आहे?'

'गोदूच्या बरोबरीची आहे.'

'अरे तुला काही लाज, शरम? कर्जाची वसुली करतोस वाटतं-?'

'नाही तात्या मला वंशाचा दिवा हवाय.'

'वासूअण्णा नाही, ही तुझी वासनेची हवस आहे. त्या कोवळ्या जिवाचा बळी घेतोयस. कमला वहिनींच्या अस्थी थंडावल्या नसतील. त्याआधीच हा अमंगल विचार तुझ्या मनात आला तरी कसा?'

वासूअण्णा विचारांनी बेभान झाला. तात्या मात्र रागात निघून गेला.

वासूअण्णानी दुसऱ्या दिवशीच पदू भटजींना बोलावून शंकराच्या देवळात विवाहाचा बेत आखला. पालकर मास्तर गहिवरले; काळजावर दगड ठेवून ते तयार झाले.

यशोदा मात्र धीराची होती. ही नियतीची इच्छा तिने कबूल केली. आपले कुटुंब ऋणमुक्त झाल्याचे समाधान तिला वाटत होते. यासाठी तिने स्वतःचे बलिदान केले. आसवांना डोळ्यांबाहेर पडू दिले नाही.

वासूअण्णांच्या घरी मात्र तिन्ही मुली अस्वस्थ होत्या. रडून रडून गळून गेल्या होत्या. गोदाला आपले बालपण आठवले. यशोदाची आठवण तिच्याभोवती रुंजी घालत होती. त्या रात्री कुणीही जेवले नाही; न कुणाचा डोळा लागला.

दुसऱ्या दिवशी सकाळी वासूअण्णा स्नान करून देवळात निघाले. वडिलांचा लग्नसोहळा मुलांनी पाहू नये असा संकेत आहे. त्यामुळे तिन्ही मुली घरीच राहिल्या. तात्याला लग्नाला बोलविले; पण तो काही आला नाही. वाड्यावरचे तीन-चार नोकर मोजकेच हजर होते. लग्न लागले. वासूअण्णा बैलगाडीतून यशोदाला घरी घेऊन आला. त्यांनी गोदाला

यशोदाचे औक्षण करायला सांगितले. गोदा निरांजन आणि तांदूळ, पाणी घेऊन आली आणि औक्षण केले.

वासूअण्णा यशोदेला घेऊन माडीवरच्या खोलीत गेला. तिथे कमलाचा फोटो टांगला होता. फोटोला हार घालून तिचा आशीर्वाद घ्यायला सांगितलं.

यशोदेने हार घातला आणि विनम्र भावाने नमस्कार केला. इतक्यात न जाणे कसा पण फोटो खाली पडून चकनाचूर झाला. छातीत धस्स झालं. यशोदा भीतीने कापत होती. वासूअण्णा पण हादरला. हा असा कसा अपशकून!

खण्णकन आवाज ऐकून गोदा धावत वर गेली. तिचा पाय घसरला आणि ती जमिनीवर आदळली. डोक्याला जबरदस्त मार लागला. गोदा अचेतन झाली. वासूअण्णा धावत खाली आला.

'गोदा, गोदा, बाळा तुला काय झालं? कशी ग तू पडलीस? उठ ना बाळा. उठ, डोळे उघड नं.'

वासूअण्णानी गड्याला सांगून वैद्यबुवांना बोलावून घेतले. आता डोक्यातून थोडासा रक्तस्राव होत होता. वैद्यबुवा म्हणाले, 'हिला ताबडतोब तालुक्याच्या हॉस्पिटलमधे घेऊन जा. हिची नाडी मंदावली आहे. प्रकृती गंभीर आहे.'

गावात अहमदचाचाची जीप होती. त्याला निरोप जाताच चाचा जीप घेऊन आला. गोदाला उचलून जीपमधे ठेवले. वासूअण्णाने गोदाचे डोके आपल्या मांडीवर घेतले आणि तो तिच्या केसावरून हात फिरवीत होता.

हॉस्पिटलमधे गोदाच्या डोक्याला टाके घातले. गोदावर प्राथमिक उपचार झाले. तीन-चार दिवस तिला हॉस्पिटलात ठेवून घेतले. वासूअण्णांनी चाचाबरोबर घरी निरोप पाठवला. तो तिच्या उशाशी डोळ्यात तेल घालून जागत होता.

घरी यशोदाने सुशी आणि चिंगीला जेऊ घातले. दोघींना आता यशोदाची भीती वाटत नव्हती. त्या दोघी यशोदाच्या कुशीत झोपी गेल्या. यशोदा मात्र रात्रभर छताकडे एकटक पाहत राहिली. दुसऱ्या दिवशी सकाळी तालुक्याकडून काय बातमी येते याची वाट पाहत राहिली. यशोदा गोदाची तब्येत सुधारू दे म्हणून कुलदेवतेला साकडं घालत होती. मुलींचा चहापाणी करून तिने अंगण झाडले आणि पाणी आणण्यासाठी विहिरीवर गेली.



तेवढ्यात प्रथमेश दारात दिसला. त्याला पाहून यशोदा थरथर कापू लागली.

'तू इथे का आलास?'

'तुला न्यायला.'

'ते शक्य नाही.'

'त्या थेरड्याशी लग्न करून तुला काय मिळालं?

'तोंड सांभाळून बोल, ते माझे पती आहेत. त्यांचे आमच्या कुटुंबावर उपकार आहेत.'

'यात माझा काय दोष?'

'दोष कुणाचाच नाही. पण परिस्थितीचा तो आदेश आहे. माझ्यावर खरंच प्रेम करत असशील तर प्रेमाचा त्याग कर. यामुळे तुझ्याविषयीचा आदर माझ्या मनात दुणावेल.' डोळे पुसत पुसत प्रथमेश निघून गेला.

वासूअण्णा दुसऱ्या दिवशी गोदाला घेऊन घरी आले. तीन-चार दिवसानंतर तिला मुंबईला न्यायचे होते. तिथे तिच्या मेंदूवर शस्त्रक्रिया करायची होती. गोदाला दिवाणखान्यात एका खाटेवर निजवले. गोदा संपूर्ण मरगळली होती. घरी आल्यावर चिंगीने प्रथमेशची बातमी सांगितली. वासूअण्णा खवळले. म्हणाले, 'तो नालायक इथे आलाच कसा. यशोदाचे थेर अजून चालूच आहेत.'

'नाही अण्णा. यशोदाआईने त्याला हाकलून लावले.' सुशीने अण्णांना सांगितले.

गोदा रात्रभर तळमळत होती. सकाळी ती अण्णांना म्हणाली,

'मला कुणीतरी आकाशातून बोलवत आहे. माझ्याकडे वेळ फार थोडा आहे. माझी एक इच्छा तुम्ही पूर्ण कराल अण्णा?'

'अग पोरी तू माझे प्राण माग; पण असे अभद्र बोलू नकोस, काय हवंय वचन तुला.'

'अण्णा, तुम्ही आत्ताच प्रथमेशला बोलावून घ्या आणि त्याचं लग्न यशोदेशी लावा. ही माझी शेवटची इच्छा आहे.' वासूअण्णा हतबल झाले. त्यांनी प्रथमेशला निरोप धाडला. तात्या आणि यशोदेच्या आई-बाबांना बोलावून घेतले. तात्याला लग्नाची तयारी करायला सांगितली. लग्नाची सारी व्यवस्था दिवाणखान्यात केली. पदू भटजींनी लग्न लावले. सप्तपदी झाली. कन्यादान कोण करणार? पदू भटजींनी विचारले. वासूअण्णा म्हणाले, 'हे

पावन कार्य मलाच करू द्या. माझ्या पापाचे आणि माझ्या अविचाराचे ते एक क्षालन आहे.' सगळ्यांच्या डोळ्यांत तेव्हा पाणी तरारले. गोदा आसवांत चिंब ओली झाली. मंगलाष्टका झाल्या. गोदाने खाटेवर निजल्या निजल्या अक्षता टाकल्या. लग्न झाल्यावर प्रथमेश आणि यशोदा गोदाजवळ आले. तिने दोघांचा हात धरला आणि म्हणाली, 'सुखाने संसार करा.'

गोदाचा हात थंड थंड झाला. आशीर्वाद देऊन गोदाने या जगाचा निरोप घेतला. तिची शेवटची इच्छा पूर्ण झाल्याने चेहऱ्यावर एक वेगळे समाधान दिसत होते.

वासूअण्णा 'गोदे अग तू का निघून गेलीस?' असे म्हणत ते एखाद्या लहान मुलासारखे रडत राहिले.

तात्याने वधू-वरास रवाना केले. गोदेच्या अर्थीची तयारी सुरू केली. वासूअण्णाच्या कन्यादानाने सगळ्यांचे मन भरून आले.

■



# निरोप

तो कितीतरी वर्षांनी तिला वाटेत दिसला. वीस वर्षांचा काळ चटकन मागे सरला. बेळगावजवळचं ते चिमुकलं गाव. निसर्गाच्या कोंदणात हसणारं, डुलणारं. गावात अनेक सजीव तळी. निळ्याशार मेघांनी आच्छादलेलं आकाश, हिरव्या झाडांची भरगच्च दाटलेली वस्ती. संध्याकाळ झाली की पश्चिमा लाजून आरक्त व्हायची. गावात वस्ती तुरळक; परंतु नाती मात्र एकमेकांना घट्ट बिलगलेली.

गावाच्या सीमेवर कुलकर्ण्यांची मोठी पेरूची बाग. सोबत निशिगंध, पारिजात, रातराणीची झाडं. मिणमिणत्या अंधारात सारा परिसर मोहक होऊन जायचा.

ती पाचवीत आणि तो आठवीत शिकत होता. शाळा सुटली की सरळ तळ्यावर जायचं. पेरूच्या बागेत मनसोक्त फिरायचं. एखादा पिकलेला पेरू दिसला की, तिने नजरेने खुणवायचं. तो खारीसारखा झाडावर चढायचा. पेरू खाली टाकायचा आणि ती परकर पसरून तो झेलण्याचा प्रयत्न करायची. तो पेरू त्यांच्या गोड भांडणाचं कारण पण असायचा. पहिल्यांदा चावा कुणी घ्यायचा? तो म्हणायचा 'तू घे' आणि ती म्हणायची 'नाही तू'. त्या उष्ट्या पेरूत एक अनाम नातं लपलेलं होतं; पण ते समजण्याइतकं दोघांचं वय झालेलं नव्हतं.

त्याला घरच्यांनी सायकल घेऊन दिली. मग काय, दोघांचा सहप्रवास सायकलवरून व्हायचा. सायकलच्या दांड्यावर बसून ती एखादी गाण्याची लकेर छेडायची. मग नकळत ते गाण्यामध्ये गुंतून जायचे. एकमेकांच्या कोवळ्या स्पर्शात हरवून जायचे. कधी कधी तर तो सायकल जोरात चालवून घामाघूम व्हायचा. पाणपोईवर जाऊन ढसाढसा पाणी प्यायचा. अशा वेळी 'किती रे दमलास' असं म्हणून ती आपल्या परकराने त्याचा चेहरा पुसायची.

बघता बघता दोन वर्षे निघून गेली. तो दहावीत आणि ती सातवीत गेली. दोघांनाही कुठेतरी तारुण्याची चाहूल लागली असावी. त्यांच्या नजरेत काहीतरी वेगळेपण जाणवत होतं. काय होतं ते? काहीतरी अव्यक्तपणे सुखद.

दहावीच्या परीक्षेचा निकाल लागला. साऱ्या जिल्ह्यात तो पहिला आला. पुढे काय करायचं? प्रश्न आ वासून उभा होता. गावात शाळा दहावीपर्यंतच होती. पुढच्या शिक्षणासाठी त्याच्या मामांनी त्याला बडोद्याला बोलावून घेतले. बडोदा किती दूरचा प्रवास. ताटातूट करणारा. नजरेच्या सीमा पार करून जाणारा.

बडोद्याला जायच्या आदल्या दिवशी ते दोघे तळ्यावर गेले. मूकपणे सूर्यास्त पाहत होते. मनात विचारांचे वादळ. शब्द मात्र ओठांबाहेर पडायला धजावत नव्हते. अंधारात त्यांचं भावविश्व बुडालं. दीर्घ श्वास घेऊन नियतीला शरण जाऊन ते निघाले. त्याने तिचा हात हातात घेतला. स्पर्श काळजास भिडला होता. आसवांनी एकमेकांचा निरोप घेतला.

दोघेही एकमेकांच्या आठवणीत दिवस ढकलत होते. बारावीनंतर त्याला मेडिकलला प्रवेश मिळाला. ती दहावीला गेली. ती आईविना पोर. बाबा शाळेत शिक्षक. डोळ्यांत स्वप्नांचा बहार. तारुण्याची चाहूल. एकीकडे अभ्यास, दुसरीकडे चूल, विचारांच्या प्रवाहात ती वाहत होती.

एक दिवस तिला त्याचं पत्र आलं. बरं झालं. बाबा घरी नव्हते. त्याने लिहिलं, 'हे पत्र तुला धाडसाने लिहीत आहे. काय लिहू काय नको सुचेनासे झालं आहे. सुरुवात काय करू, कुठून करू? गोंधळ उडालाय. तुझ्याविषयी मला विलक्षण आकर्षण होतं. हे आकर्षण म्हणजे प्रेम का? कदाचित 'हो' कदाचित 'नाही'.

एक गोष्ट निश्चित, तुझ्याविना जगणं शक्य नाही. सायकलीवर झालेला तुझा स्पर्श आजही मला रोमांचित करतो.

मी डॉक्टर झालो की बेळगावला येईन. कशाला माहीत आहे नं, माझ्या राणीला न्यायला. निमूटपणे आलीस तर ठीक; नाहीतर बळजबरीने तुला उचलून नेईन.

तुझ्या उष्ट्या पेरूची खूप आठवण येते. तुझं निरागस हसणं, लटकं रुसणं मला घायाळ करत होतं. तुझे साधेपण, निसर्गावर अमाप प्रेम हेच तुझं खरं सौंदर्य आहे.

काय ग, मी आल्यावर माझा चेहरा परकराने पुसशील नं? 'फाजील कुठला!' ती स्वतःला आरशात पाहून म्हणाली. तुझा चावटपणा माझ्या लक्षात आलाय.

जे तू पत्रात लिहिलंयस ते बोलून का दाखवलं नाहीस? मला विचारलं असतंस तर मी तुला सांगितलं असतं. काहीही न बोलता तुझ्या खांद्यावर डोकं ठेवून, घट्ट डोळे मिटून कदाचित तुझा हात हातात घेतला असता आणि माझा स्पर्श सर्व काही सांगून मोकळा झाला असता.

आता काळ पाच वर्षांनी सरकला होता. तिने बाबांना सगळं लाजत लाजत सांगितलं. इतकं सुंदर स्थळ कुठे मिळणार होतं? दोन घरांत मैत्री होती, ती नात्यांत परिवर्तित झाली. तो आला. लग्न साधेपणानं पार पडलं. ती बडोद्याला गेली. मास्तर एकटे पडले. खूप रडले. पण समाधानाने.

राजा राणीचा संसार बडोद्याला सुखाने सुरू झाला. नोकरीबरोबरच त्याने पुढचे शिक्षणपण चालू ठेवले. त्याला सर्जन व्हायचे होते. तो एक निष्णात सर्जन झाला. त्याचबरोबर त्याची उच्चभ्रू लोकांमध्ये उठबस वाढली. पार्ट्यांना जाणं. क्लबमध्ये जाणं हे प्रतिष्ठेचं बनलं. स्टेटस सिंबॉल.

ती मात्र साधीच राहिली. साधी लिपस्टिक लावणं तिला पसंत नव्हतं. तो मात्र आता बहकला होता. ड्रिंक्सच्या आहारी गेला होता. ती पार घुसमटली होती. मानसिक तणाव गुपचूप सहन करत होती. तिच्या दुःखाला पार नव्हता. लग्न होऊन चार-पाच वर्षे झाली; पण तिची कूस रिकामी होती. व्रत, वैकल्य, उपासतापास काही कामास आले नाही. तिने त्याला अनेकदा विचारले, 'मी आई का होऊ शकत नाही? तो म्हणाला 'तुझं नशीब वांझोटं आहे. निसर्गाने तुझं मातृत्व झुगारलं आहे.' संसारात बेळगावच्या प्रेमाचा लवलेशपण उरला नव्हता. रोजच्या कटकटी आणि भांडणं याला ती कंटाळली होती.

त्या दिवशी तिचा वाढदिवस होता. तिने केक आणला. त्याच्या आवडत्या पुरणपोळ्या आणि आळुवड्यापण केल्या. रात्री कँडल डिनर

करायचा असा तिने मानस केला. तो रात्री साधारण नऊ वाजेपर्यंत यायचा. नऊ झाले, दहा झाले, अकरा वाजले तरी त्याचा पत्ता नव्हता. ती डायनिंग टेबलावर डोके ठेवून झोपली.

तो नशेत चूर होऊन पहाटेला घरी आला. तो केक, ती जेवणाची भांडी पाहून म्हणाला, 'वाढदिवस साजरा करायला लहान बाळ नाही राहिलीस. उगाच थेरं करू नकोस. मूर्ख कुठली.'

'तू किती रे बदललास?'

'पण तू मात्र जुनाट, बुरसट विचारांची राहिलीस. पार्टीला साधी लिपस्टिक लाव म्हटलं तर नाही जमत तुला. गावंढळ कुठली! लाज वाटते तुझी मला. पश्चाताप होतोय तुझ्याशी लग्न केल्याचा.'

'तुझं बोलणं माझ्या जिव्हारी लागतंय.'

'त्यावर एकच उपाय आहे.'

'काय?'

'घटस्फोट. मी वकिलाकडून कागदपत्र तयार करून आणले आहेत. त्यावर सही कर. आपला एक जॉईंट अकाउंट आहे. त्या अकाउंटमध्ये दरमहा मी दोन-तीन हजार पाठवून देत जाईन. इतके पैसे पुरेसे आहेत तुला त्या खेडेगावात आरामात राहण्यासाठी.'

'म्हणजे त्या नर्सची बातमी मी ऐकली ती खरी आहे?'

'कोणती नर्स?'

'जिच्या कमरेत हात घालून पार्ट्यांमध्ये दारू पिऊन नाचतोस ती.'

'कळलं ना आता तुला? मग गुपचूप कागदावर सही कर. जगू दे मला माझ्या स्टाइलने!'

'मला एक दिवसाचा अवधी दे.'

'ठीक.'

दुसऱ्या दिवशी तो हॉस्पिटलला गेला. तेव्हा ती विचार करू लागली. मी अशी गावंढळ. त्याच्या प्रतिष्ठेला विफल करणारी व्यक्तिरेखा. आमची विश्वं वेगळी आहेत. मी त्याच्या आनंदात बाधा होऊन बसली आहे. मी त्याच्यावर अजूनही प्रेम करते आहे. मग प्रेमाचा खरा अर्थ काय? त्यागच ना! घटस्फोट झाला तर तो त्या नर्सशी लग्न करू शकेल. त्याला मुलंबाळं होतील. घराचं गोकूळ होईल. त्याच्या काही गोड आठवणी माझ्यासोबत आहेत. उरलेलं आयुष्य कंठण्यास त्या पुरेशा आहेत. तिने कागदावर सह्या केल्या. बॅग



भरली. गावच्या जत्रेत लहानपणी त्या दोघांनी एक फोटो काढला होता. तो मात्र बरोबर घेतला. त्याला न कळवता गाडी पकडली आणि निघून आली.

तिला पाहून बाबांना आश्चर्य वाटलं. खरं कारण कळलं तेव्हा ते भळभळा रडले. ती म्हणाली, 'बाबा, मला तुमचा आशीर्वाद हवाय. मी परिस्थितीशी लढणार आहे. नियतीच्या हातातलं बाहुलं बनून नाही मला जगायचं.' तिचा दुर्गेचा अवतार पाहून बाबांना आश्चर्य वाटलं.

आज तो अचानक समोर आला. खंगलेला, दयनीय अवस्थेत दिसत होता. त्याने विचारले, 'कशी आहेस?'

'जशी दिसते तशी. तू अशा अवस्थेत का?'

'कसं सांगू तुला? आपण त्या पेरूच्या बागेत जाऊ या का?'

'नाही, भूतकाळाचे दरवाजे मी कधीच बंद केले आहेत. मुद्याचं बोल. मला शाळेत जायला उशीर होतोय.'

'शाळेत?'

'होय, मी शाळेत शिक्षिका आहे. शिक्षिका म्हणण्यापेक्षा मी तिथे मुख्याध्यापिका आहे. इथे आल्यावर मी ओपन युनिव्हर्सिटीचा अभ्यासक्रम केला. इंग्लिश घेऊन एम.ए. झाले. वांझोटी होते; पण आज मी अनेक विद्यार्थ्यांची आई आहे.

'मला क्षमा कर.'

'ती वेळ आता निघून गेली आहे. त्या नर्सशी लग्न केलं का? किती मुलं झाली तिच्यापासून?'

'ती गर्भार राहिली आणि माझा संसार परत एकदा मोडला.'

'का? तुला मुलं हवी होती ना? मी वांझोटी होते. तुझ्या त्या नर्स पत्नीनं तुला बाबा होण्याचं सुख दिलं असेल नं?'

'ती गर्भार झाली आणि माझे डोळे उघडले.'

'म्हणजे काय मला समजलं नाही.'

'काय सांगू तुला? तू वांझोटी कधीच नव्हतीस माझ्यात बाबा होण्याची क्षमता नव्हती.'

'पण तू तर मला दोष देऊन मोकळा झालास.'

'तो माझा पुरुषार्थ होता. मला क्षमा कर.'

'पण तुझी नर्स पत्नी आई होणार ही तर आनंदाची बातमी होती. तर मग तू अपसेट का झालास?'

‘अग तिचं आधीच लग्न झालं होतं. तिचा नवरा ड्रग स्कँडलमध्ये दहा-बारा वर्षे तुरुंगात होता. तो सुटून आला. तिने माझा पैसा वापरला; पण शरीरसुख मात्र तिच्या नवऱ्याला.’

‘ती आता कुठे आहे?’

‘आपल्या नवऱ्याकडे निघून गेली.’

‘मग आता तू इथे कशाला आलास?’

‘मी बडोदा सोडून कायमचं इथे आलोय.’

‘का?’

‘मीपण तीन वर्षांचा कारावास भोगून आलो.’

‘का, असं काय झालं?’

‘मी मद्यधुंद होऊन एक ऑपरेशन केलं. माझ्या चुकीमुळे पेशंट ऑपरेशन टेबलावर गतप्राण झाला. त्याच्या नातेवाइकांनी माझ्याविरुद्ध फौजदारी गुन्हा दाखल केला. मला कोर्टाने तीन वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा सुनावली.

‘मग आता काय करणार आहेस?’

‘इथे काहीतरी छोटा मोठा उद्योग करीन. तुला एक विचारू का?’

‘विचार नं.’

‘काय आपण पुन्हा एकत्र येऊ शकतो का?’

‘मुळीच नाही. मला माझं एकटेपण प्रिय आहे. लहानपणीच्या काही गोड स्मृती माझ्या सोबत आहेत. माझं उर्वरित आयुष्य सहज पार होईल.’

‘तुझं प्रेम आटलंय. आपला तो लहानपणीचा जत्रेतला फोटो का घेऊन गेलीस?’

‘त्या फोटोत तुझा निरागस चेहरा आहे. अरे हो, एक सांगायचं राहिलं. आपल्या बेळगावच्या जॉईंट खात्यात तू जे मला पोटगी म्हणून पैसे पाठवत होतास त्याला मी हातही लावला नाही. ते पैसे काढून घे. तुझ्या कामास येतील.’

ती निघाली. कदाचित ती मागे फिरेल या आशेने तो वाट पाहत होता. ती क्षणभर थबकली. तिच्या डोळ्यांत अश्रू होते. तिने मागे वळून न पाहता त्याला निरोप दिला.

■



# हॅलो १९८

सुहासनी पब्लिक बूथवरून १९८ ला फोन केला.

‘अहो, माझ्या घरचा नंबर ४७४६६६ गेले दोन-तीन दिवस बंद आहे. प्लीज...’

‘तुमची कंप्लेंट नोंदविली आहे. जी ४३३४’ एक यंत्रवत आवाज.

‘अहो मला कंप्लेंट नंबर नकोय. गेल्या दोन-तीन दिवसांत दहा-वीस तक्रारी केल्या. माझा मुलगा गेल्या रविवारी अमेरिकेला गेलाय. त्याचा फोन यायचाय. मी खूप परेशान झालोय हो. प्लीज मला पर्सनल मदत करा.’

‘तुम्ही काळजी करू नका. मी बघते काय करता येईल ते.’ एक आपुलकीचा आवाज सुहासने ऐकला.

संध्याकाळी पाचच्या सुमारास सुहासच्या घरच्या फोनची घंटा खणखणली. त्याने अत्यानंदात फोन उचलला.

‘हॅलो कोण बोलतंय? मी टेलिफोन एक्स्चेंजमधून बोलतेय.’ तिकडून चौकशी झाली.

‘मी.... मी नं, सुहास कुलकर्णी.’

‘तुमचा टेलिफोन मी एस.डी.ओं.ना रिक्वेस्ट करून ठीक करून घेतला.’

'अहो, तुमचे हे उपकार....'

'छे, छे! हे उपकार कसे? हे तर आमचे काम होतं. तुम्ही मुलाचं नाव घेतलंत आणि मी अस्वस्थ झाले.' सुहासला एक दीर्घ उसासा ऐकू आला.

'मी काही पर्सनल विचारू का?'

'विचारा की.'

'मुलाचं नाव घेताच आपला शब्द जड झाला. एक गहिरा उसासा कानावर आला. एनिथिंग सीरियस?'

'आपण केव्हातरी या विषयावर बोलू. आपण माझ्या घरचा नंबर लिहून घ्या. काही अडचण आली तर मला सांगा.'

'अहो माझ्याकडे शब्द नाहीत. मी आपला शतशः आभारी आहे. आपण फोन नंबर दिलात, पण नाव नाही सांगितलं.'.'

'मिसेस वैजयंती मोहिले.'

'थँक्स' फोन ठेवला गेला.

वैजयंतीच्या मेहरबानीमुळे श्रेयसचा फोन आला. सुहास कृतकृत्य झाला. न्यू जर्सी युनिव्हर्सिटीमध्ये त्याला इंजिनियरिंगसाठी प्रवेश मिळाला. एका गुजराती कुटुंबात पेइंग-गेस्ट म्हणून व्यवस्थापण झाली.

सुहासची काळजी मिटली. चार वर्षे चुटकीसरशी निघून जातील. श्रेयस परतला की त्याचं धूमधडाक्याने लग्न करायचं. उर्वरित आयुष्य नातवंडांना खेळविण्यात घालवायचं, असे कितीतरी मनसुबे सुहासनी मनात बाळगले होते.

श्रेयसच्या खुशालीची बातमी देण्यासाठी सुहासने फोन फिरवला.

'हॅलो, आपण वैजयंती का? मी....'

'आपण कुलकर्णी साहेब. बरोबर? तुमचा आवाज मी ओळखला. लेकाचा फोन आला नं!'

'होय. पठ्ठा मजेत आहे. हे केवळ तुमच्यामुळेच.....'

'जाऊ द्या हो. तुम्हाला आनंद मिळाला यातच मला समाधान झालं.'

'राग येणार नसेल, तर एक विचारू?' सुहासने कचरत प्रश्न केला.

'अगदी मनमोकळेपणानं विचारा.'

'मी तुम्हाला अधून-मधून फोन केला तर चालेल?'

'मला आवडेल' वैजयंतीने फोन ठेवला.

वैजयंतीसारखी चांगली माणसं कुठे मिळतात? सुहासने वैजयंतीशी मैत्री करण्याचं ठरवलं. एक शुद्ध मैत्री. पावन भावनांत गुंफलेली, निर्व्याज.



आठ-दहा दिवसांनी वैजयंतीचा फोन आला.

'काय म्हणताय कुलकर्णी साहेब?'

'काय हो मला साहेबबिहेब म्हणणं जरुरी आहे का?' सुहासने थोडंसं निर्ढावून विचारलं. 'आपली दोस्ती झाली आहे, मग ही कृत्रिमता का?'

'बरं बाई चुकले. यापुढे नाही ही कृत्रिमता आढळणार.'

'काय हो, त्या दिवशी तुम्ही....'

सुहासचं बोलणं वैजयंतीने मधेच तोडले. ती म्हणाली.

'दोस्ती करता आणि अहो-जाहोची भाषा बोलता.'

'आय ॲम सॉरी. बरं का वैजयंती आपण फोनवर खूप खूप बोलायचं. सुख-दुःखाच्या गोष्टी करायच्या. एक दुसऱ्यांना मनोगत सांगायचं, पण प्रत्यक्षात मात्र कधीच भेटायचं नाही.'

'अरे काय विचित्र अट आहे ही! असं का?'

'वैजयंती, ती माझी परिकल्पना आहे. एका अनामिक मैत्रीची. माझ्या जिवाभावाच्या मैत्रिणीची जिला कधीच पाहणार नाही.'

आपली एक दुसऱ्याला भेटण्याची ओढ कायम राहील. आपले औत्सुक्य सदाबहार असेल. आपण मनाने एकत्र येऊ या. आपल्या मैत्रीच्या प्रतिमेला मनाचे रंग देऊ या. एक जगावेगळी, अनोखी मैत्री!'

'सुहास तुझी फिलॉसॉफी कळणं कठीण आहे.'

'काय ग, मी असा फोन केलेला तुझ्या घरच्यांना आवडेल नं?'

'आवडेल की, घरात काय, मी आणि माधवी.'

'माधवी कोण?'

'माझी मुलगी दहावीला आहे.'

'आणि मि. मोहिले?'

'नाहीत. ही इज नो मोअर!'

'अरेरे! कशाने गेले ते?'

'ॲक्सिडेंटनी'

'ॲक्सिडेंट!'

'हो दहा वर्षांपूर्वीची ही कथा. सतीश म्हणजे माझे मिस्टर टेलिफोनमध्ये इंजिनियर होते. आमचा प्रेमविवाह होता. लग्नानंतर पहिला माधव आणि दोन वर्षांनी माधवी झाली. आमचा संसार सुखाचा होता. एक दिवस आम्ही चौघे गिरगाव चौपाटीवर फिरायला गेलो होतो.

परतताना माधवीसाठी एक सूट घ्यायचा होता. आम्ही ऑपेरा हाऊसला गेलो. दुकानासमोर मी आणि माधवी खाली उतरलो. सतीश आणि माधव पार्किंग नसल्यामुळे थोडे पुढे गेले.

तेवढ्यात मागून दोन मुले आली. स्कूटरवर होती. माझ्या गळ्यातलं मंगळसूत्र त्यांनी हिसकावलं आणि पळून गेली. मी आणि माधवी खूप किंचाळलो.

सतीशने आक्रोश ऐकला. त्याने भर वेगाने कार चोरट्यांच्या मागे पळविली. पाठलाग मरीन ड्राइव्हपर्यंत केला. दुर्दैवाने एक अंध बालिका रस्ता क्रॉस करीत होती. सतीश अत्यंत वेगात होता. त्या बालिकेला वाचविण्यात कार रोड डिव्हायडरच्या विजेच्या खांबावर आदळली. कार चेंदामेंदा झाली सतीश आणि माधव रक्ताच्या थारोळ्यात पडले. दोघांचे प्राणोत्क्रमण क्षणार्धात झाले. त्या चोरट्यांच्या रूपाने काळाने माझे सौभाग्य हिरावले.'

'वैजू, आय ॲम व्हेरी सॉरी.'

काही वेळ निःस्तब्धता पसरली. शब्द व्यथेत होरपळले.

'मला काय नावाने हाक मारलीस?'

'माझं काही चुकलं का?'

'नाही. मला सतीश त्याच नावाने हाक मारायचा. आज खूप दिवसाने ती हाक कानावर आली.'

दोघांनी आपले टेलिफोन खाली ठेवले. दोघेही आपल्या मनाच्या नीरव शांततेत कुठेतरी हरवून बसले.

या जगात सर्व सुखी कोण आहे? प्रत्येकजण आपली सुखं-दुःखं खांद्यावर घेऊन जगतो. सुहासचं दुःख हृदयात धुमसत होतं; पण त्याचे पडसाद त्याने कधीही चेहऱ्यावर उमटू दिले नाहीत. लग्नानंतर तब्बल पाच वर्षांनी श्रेयस झाला. संसार गरिबीच्या चौकटीत; पण समाधानाचा होता.

सुहास लॅमिंग्टन रोडवर एका ऑटो पार्ट कंपनीत अकाउंटट होता. कर्ज घेऊन का होईना एक छोटासा ब्लॉक त्याचा होता. साधं राहणीमान.

त्या वर्षी मुंबईत काविळीची प्रचंड लाट आली. श्रेयसच्या आईला बाधा झाली. देशी-विदेशी औषधे, तांत्रिक-मांत्रिक सर्व उपाय झाले; पण यश काही येईना. बघता बघता तिचे यकृत सुजले. कावीळ रक्तात भिनली. तिला स्वतःची काळजी नव्हती. श्रेयसचं कसं होईल याची चिंता तिला खात होती. ती म्हणाली, 'अहो माझं बरं वाईट झालं तर श्रेयसची काळजी घ्या.



वेळप्रसंगी दुसरं लग्न करा; पण श्रेयसला अंतर देऊ नका.'

'तू अभद्र बोलू नकोस. तू लवकर बरी होशील.' असा खोटा दिलासा देत सुहास म्हणाला.

सुभद्रेची म्हणजे श्रेयसच्या आईची तब्येत हाताबाहेर गेली. तिचे अन्नपाणी सुटले. एक दिवस तिने श्रेयसला मांडीवर देण्यासाठी हट्ट-धरला. अंगात त्राण नव्हते. ती त्याच्या डोक्यावरून थरथरता हात फिरवीत होती. डोळ्यातून अश्रूंच्या धारा वाहत होत्या. काही क्षणांतच हात थांबला, डोळे स्थिरावले. सुभद्रेची प्राणज्योत मावळली.

सुहासने दुसरं लग्न नाही केलं. काही वर्षे शारदामामी येऊन राहिल्या; पण गावची शेतीवाडी सांभाळणार कोणी नव्हतं म्हणून त्या निघून गेल्या. नंतर सुहासनेच आई आणि बाबांच्या दोन्ही भूमिका पार पाडल्या.

श्रेयस नाव सार्थक होतं. शाळेत अभ्यासात आणि वक्तृत्व स्पर्धेत त्याने अनेक बक्षिसे मिळवली. शिक्षकांचा तो अत्यंत लाडका विद्यार्थी होता. त्याचं संपूर्ण शिक्षण स्कॉलरशिपवर झालं. श्रेयस आय.आय.टी.मधून मेकॅनिकल इंजिनिअर झाला.

श्रेयसला न्यू जर्सी युनिव्हर्सिटीमध्ये पुढील अभ्यासाकरिता स्कॉलरशिप मिळाली. बस प्रश्न होता सुरुवातीचे विमानभाडे, तिथे राहण्याची व्यवस्था यासाठी किमान पन्नास हजारांची आवश्यकता होती. सुहासकडे सेव्हिंग्ज असं काहीच नव्हतं. एकच पर्याय होता. सुहासने राजीनामा द्यावा आणि प्रॉव्हिडंड फंड घेऊन श्रेयसला अमेरिकेला रवाना करावा.

ऑफिसमधले लोक म्हणत होते हा शुद्ध वेडेपणा ठरेल. श्रेयसपण नको नकोच म्हणत होता; पण या वेडेपणामुळे श्रेयसचं आयुष्य फुलणार होतं. सुहास विचार करण्याच्या पलीकडे गेला होता.

श्रेयस रवाना होण्याचा दिवस आला. तो बाबांच्या छातीवर डोकं ठेवून ढसाढसा रडला. शब्दांना जे नाही जमलं ते आसवांनी दाखवलं. सुहास विचार करण्याच्या पलीकडे गेला होता.

चार वर्षे कुठं निघून गेली कळलं नाही. यादरम्यान सुहासची वैजयंतीशी गट्टी छान जमली. सुख-दुःखाच्या गोष्टी होत राहिल्या. प्रत्यक्षात भेट मात्र कधीच नाही झाली. एक दिवस श्रेयसचा फोन आला.

'हाय डॅड.'

'काय रे कालपर्यंत मी तुझा बाबा होतो. आज डॅड कसा झालो?'

‘मी आज सांगतो ते ऐका. वाईट वाटून घेऊ नका. थोडासा विचार करून पाहिलंत तर माझं म्हणणं पटेल.’

‘अरे राजसा, असं तू का बोलतोस? तू निःसंकोचपणे बोल. मला खात्री आहे. तू स्वप्नातही पण मला दुखावणार नाहीस.’

‘बाबा इथे मी युनिव्हर्सिटीमध्ये पहिला आलो. डेट्रॉईट सिटीत एक लठ्ठ पगाराची नोकरी पण मिळाली.’

‘अरे वा! छान झालं की.’

सुहास हर्षोल्हासात उद्गारला.

‘पण डॅड माझ्याच वर्गात सुझी नावाची मुलगी होती. आम्ही लव्हमॅरेज केलं.’

‘अरे पण ती आंग्ल.’

‘डोन्ट बी कन्झर्वेटिव्ह.’

‘सुझी अमेरिकन सिटिझन आहे. तिची आई इटालियन होती.’

‘होती म्हणजे?’

‘त्यांचा घटस्फोट झालाय. दोघांनी वेगवेगळी लग्ने केली. सुझीचा आधार तुटलाय. ती एकटी आहे.’

‘अरे पण ती आपल्या मराठमोळ्या संस्कृतीमध्ये रुळेल का?’

‘नाही डॅड, सुझी इंडियात यायला तयार नाही. तिच्यामुळे मला ग्रीनकार्ड मिळेल. सुझी म्हणते तुम्ही वृद्धाश्रमात जावं. आम्ही इथून पैसे पाठवू. पैशाची काळजी करू नका. तुमच्या नावाने पन्नास हजार रुपयांचा ड्राफ्ट पाठवला आहे. बँकेत टाका म्हणजे दरमहा खर्चापुरते पैसे मिळतील.’

‘श्रेयसा, माझी काळजी करू नकोस. तू कुठेही रहा, पण सुखी रहा. माझे आशीर्वाद तुमच्या पाठीशी सदैव असतील.’

टेलिफोन सुहासच्या हातून गळून पडला. सारं आकाश कोसळलं. रात्रभर तो अश्रू ढाळत छताकडे एकटक पाहत होता. आठवणींचा एक एक क्षण मनास शिवून पुढे जात होता.

दुसऱ्या दिवशी गुरुवार होता. वैजयंतीचा वीकली ऑफ होता. सुहासनी फोन फिरवला.

‘वैजू’

‘अरे तुझा आवाज असा का रडवेला झालाय?’

‘काय सांगू तुला. श्रेयसचा फोन आला होता. त्यानं तिथं एका अमेरिकन मुलीशी लग्न केलंय.



‘अरे बापरे! मग?’

‘अग तो इथे यायला तयार नाही. मला म्हणतोय की तुम्ही वृद्धाश्रमात जा. माझे पन्नास हजार रुपये त्यानी परत केले.’

‘सुहास, टेक इट इझी. अरे या जगात माणसाला सगळी सुखं कुठे मिळतात?’

‘वैजू मला माझा विश्वास तुटल्याचं दुःख होतंय. असे कसे ग नात्याचे रंग बदलले? आत्तापर्यंत मुलं पोरकी होताना पाहिलीत. आज एक बाप पोरका झालाय. मी पार कोलमडलोय ग’

‘नाही सुहास, तुला परिस्थितीला सामोरे जायचंय. अरे तू कोलमडलास तर आपली दोस्ती कोलमडेल.’

‘माझ्यात आता त्राण उरलं नाही. संपलं. आयुष्य संपलं. वैजू आता कोणासाठी जगू?’

‘आपल्या मैत्रीसाठी. त्या अपूर्व दोस्तीसाठी. त्या जिव्हाळ्याच्या पण अनामिक नात्यासाठी.’

‘सुहास आपण भेटू या का?’

‘नाही वैजू. माझ्या विश्वासाला एकदा तडा गेलाय. दुसऱ्यांदा नाही सहन होणार. तुझी प्रतिमा आता माझ्या जीवनाचा आधार आहे. तिला मी प्राणापलीकडे जपेन.’

सुहासचं बोलणं ऐकून वैजयंती खिन्न झाली. तिचा उतरलेला चेहरा माधवीने टिपला.

‘मम्मा’ इज समथिंग रॉंग?’

‘बेटा सुहासकाकांचा फोन आला होता.’ वैजयंतीने सगळी बातमी इत्थंभूत सांगितली.

माधवी म्हणाली, ‘मम्मा, तुमची मैत्री किती वर्षांची आहे?’

‘चार-एक वर्षे झाली असतील.’

‘तुम्ही एक दुसऱ्याची सुख-दुःख वाटता नं?’

‘प्रांजळपणे, होय.’

‘आजच्या तारखेला तुम्ही दोघे जिवाभावाचे मित्र आहात नं?’

‘निःसंशय.’

‘मग तुम्ही एक दुसऱ्यांना का भेटत नाहीत?’

‘सुहासची तशी मैत्रीची अट आहे.’

'माझं लग्न झाल्यावर मी कॅनडाला जाईन. मग तुझं कसं होणार?'

'का, मी एकटी राहीन. या एकटेपणाची मला सवय होईल. अगदीच उदासीन झाली तर सुहासशी फोनवर गोष्टी करीन. त्याच्या शब्दांत जादू आहे. विचारांचं पावित्र्य आहे.'

'मम्मा, मला काकांचा नंबर सांग.'

'कशाला?'

'मग सांगेन.'

माधवीने सुहासला फोन केला.

'हॅलो काका, मी माधवी बोलतेय.'

'बोल बेटा, आज फोन तू कसा काय केलास? वैजू, आय मीन वैजयंती ठीक आहे नं?'

'काका, वैजयंतीवरून तुम्ही वैजूवर कधी आलात?'

'फाजीलपणा करू नकोस.'

'माझं असं म्हणणं होतं, जसे तुम्ही वैजयंतीवरून वैजूवर आलात. तसेच काकांचं बाबा व्हायला काय हरकत आहे?'

'तू काय बोलतेस, कळतंय का तुला?'

'होय, मी सायकॉलॉजीची स्टुडंट आहे. तुमची आणि मम्माची केस मी मानसबरोबर डिस्कस केली. मानस म्हणजे माझा आजचा मित्र, उद्याचा नवरा. मुंबई युनिव्हर्सिटीचा टॉपर आहे.'

'मग काय म्हणतोय तुझा टॉपर?'

'तो म्हणतो, तुम्ही एक दुसऱ्याला चाहता, पसंत पण करता. फक्त दोघेही घाबरट आहात.'

'काका तुम्ही घाबरता समाजाला. तुम्ही घाबरता तुमच्या मुलांना म्हणूनच आपल्या भावनांना मनाच्या कोंदणात दडपून टाकलंत. एक दुसऱ्यांना न भेटणं हे भीतीच्या पोटी होतं.'

'मी तुम्हाला माझ्या मम्मासाठी मागणी घालते.'

'ए, दीडशहाणे, जिभेला आवर घाल. वैजूने ऐकलं तर काय म्हणेल?'

'काका, एक सांगू का मला दीडशहाणे म्हणणारे बाबा आवडतील आणि मम्माबद्दल बोलत असाल तर तुमची वैजू माझ्याशेजारीच बसली आहे. बरं का चक्क लाजली आहे.'

'चावट कुठली.'



'मी काय समजू?'

'विचार करून सांगतो.'

'एक सांगू?'

'हं.'

'तुमची विकेट पडली.'

सुहास आणि वैजूने रविवारी बसस्टँडवर भेटायचं ठरवलं. दोघांची दृष्टादृष्ट झाली. वैजू मोरपिशी साडीत खुलून दिसत होती.

सूर्याच्या सान्निध्यात मावळती लाजून लाल झाली. समुद्राच्या लाटा लयबद्ध नाचत होत्या. शब्द अबोल होते; पण खूप काही सांगत होते.

सुहास आवंढा गिळून म्हणाला, 'मी तुझ्यासाठी गजरा आणलाय.'

'मग माळ की केसात.'

'नको थोडासा अंधार होऊ दे. लोक पाहतील.'

सुहासचा भोळेपणा वैजयंतीला खूप आवडला. ती गालात हसली. सूर्याने त्या दोघांचा निरोप घेतला. सुहास आणि वैजू एकमेकांना खेटून बसले. त्या स्पर्शात एक अनामिक जवळीक स्पंदनात रुजली.

सुहास म्हणाला, 'ए १९८, काही तरी बोल नं?'

'तुमची कंप्लेंट नोंदविली....'

दोघेही मनमोकळे हसले. सुहासने वैजयंतीच्या केसात गजरा माळायला घेतला. तेवढ्यात मागून 'शुक-शुक' असा आवाज आला. सुहास दचकला. त्याने मागे वळून पाहिले.

'काय मुलगी पसंत आहे नं?'

त्यांची दीडशहाणी मुलगी खिजवून विचारत होती...

■

# अन्याय

मी अभ्यासिकेमध्ये बसून माझी काही वर्षांपूर्वी लिहिलेली कादंबरी चाळत होतो. त्या कादंबरीतली पात्रं भूतकाळात लोटली होती. त्या पात्रांविषयी फारसं औत्सुक्य माझ्या मनात नव्हतं.

कादंबरीतले सदाशिवराव अचानक माझ्या समोर आले, 'अरे नाना, तुम्ही इथे? कसं काय येणं केलंत?' 'बरेच दिवस तुम्हाला भेटायचं म्हणत होतो. आज योग आला.'

'काही खास प्रयोजन?'

'काही प्रश्नांची उत्तरं शोधतोय. तुमच्याकडे मिळतील या आशेने आलो.'

'विचारा, निःसंकोच विचारा. आपण आमचे विधाता. आम्ही काल्पनिक असलो तरी मानवी भावना शब्दरूपात आम्हाला आपण देता. म्हणूनच कादंबरीत सजीवता येते. स्वप्न वास्तव-सदृश होते.

तुम्ही मला कस्तुरचंद मिलमध्ये कारकुनाची नोकरी दिलीत. जिथे महिन्याकाठी धड पगार पण मिळत नव्हता. जन्मभर मला कुंभारवाड्यातल्या चाळीत कोंडलंत. याविषयी माझी काहीही तक्रार नाही.



माझं लग्न झालं. पत्नी गरिबाघरची होती; त्यामुळे परिस्थितीशी तिने जुळवून घेतलं. विभा नावाची गोंडस मुलगी तुम्ही आमच्या पदरात घातलीत. धन्यवाद.

विभा तीन वर्षांची असताना तिचं मातृसुख आपण हिरावून घेतलंत. का? त्या बिचारीने तुमचं काय घोडं मारलं होतं?

आईविना मुलांना वाढवणं किती कठीण आहे, याची कल्पना आहे तुम्हाला?'

'अहो नाना, या जगात कित्येक अनाथ मुलंही जगतातच ना? काय आपण परमेश्वराला त्याचा जाब विचारू शकतो?'

'अहो, पण तुम्ही आमचे विधाता नंबर एक; आपल्याला मानवी संवेदना परमेश्वरापेक्षा अधिक चांगल्या कळतात.

विभाचे अश्रू पाहून मी गलबलून जात होतो. आपल्याला त्याचं काहीच वाईट वाटत नव्हतं. ती आई शोधत होती. आई कुठे गेली म्हणून सतत विचारत होती. एकदा तिला म्हणालो मी, 'आई देवाकडे गेली' मग काय ती घट्ट धरून बसली. मला आत्ताच्या आता देवाच्या घरी जायचंय. आईला भेटायचंय. तो निरागस चेहरा पाहून माझ्या काळजात चर्रर झालं. काय उत्तर देणार होतो मी ?

तसा मी रामभक्त. पाध्येवाडीतल्या रामाच्या देवळात न चुकता जात होतो. मी विचार केला, माझ्या स्वामींना कुठे पत्नीसुख मिळालं? त्यांना सीतेचा विरह टाळता नाही आला. मी तर एक क्षुद्र मनू.

विभाला वाढवताना माझी त्रेधा उडाली. तिची वेणी घालणं, आंघोळ घालणं मला अजिबात जमत नव्हतं. तिला कपडेलत्ते, तिचे लाड नाही पुरवता आले. तिचं बालपण आपण हिरावून घेतलंत. पण त्याबद्दल तिने कधी तक्रार नाही केली.

विभा पंधरा-सोळा वर्षांची झाली. ती लावण्याची खाण होती. तिने तारुण्यात पदार्पण केलं आणि माझ्या छातीत धडधड वाढली. लोकांच्या विखारी नजरेतून तिला वाचवणं कठीण होऊन बसलं.

मग एक दिवस तुम्ही बारक्या पांचाळकडून तिच्यावर बलात्कार घडवलात.'

'नाना. या देशात रोज असंख्य बलात्कार घडतात नं. त्यात नवल ते काय?'

ज्या कोवळ्या मुलीवर असे प्रसंग ओढवतात, तिच्या भावना तुम्हाला कळतात? तिच्या पित्याची घालमेल तुम्ही कधी समजून घेतलीत? तुम्हाला हे कसं कळणार? शेवटी बारक्या तुमच्याच मनाचं प्रतिनिधित्व करतो ना?'

'नाना, ही माझी कादंबरी आहे. इथे पात्रांना कुठल्या परिस्थितीत टाकायचं, हा माझा अधिकार आहे. तुम्ही मला प्रश्न कसे विचारू शकता?'

'माफ करा मला. मी मर्यादा ओलांडतोय. विभावर ओढवलेल्या अतिप्रसंगाने माझं काळीज फाटलंय. तुम्ही त्या अतिप्रसंगाचे केलेले ते बीभत्स वर्णन....'

'थांबा नाना', तेवढ्यात मला त्या प्रश्नांची उत्तरं हवी आहेत.' विभा तेथे आली व म्हणाली.'

'लेखक महोदय, आपण माझ्यावर बलात्कार घडवून आणलात. तो का आणलात हे मी तुम्हाला नाही विचारणार. माझ्या छिन्नभिन्न अंगाचे, रक्ताळलेल्या शरीराचे आणि बारक्याच्या पाशवी रूपाचे वर्णन पाच-पाच, सहा-सहा पाने लिहिलीत. का, कशासाठी?'

'ती प्रकाशकाची मागणी होती.'

'इथे प्रकाशकाची काय भूमिका?'

'माझी कादंबरी छापण्यासाठी तो पैसा लावतोय.'

'लेखक महोदय, अशा वर्णनाने युवा पिढी विकृत होईल त्याचं काय?'

'मी समाजसुधारक नाही. तू मॉरिओ पिझोचं नाव ऐकलंस? त्यानी 'टू वुमेन' कादंबरी लिहिली. त्यात तुझ्याचइतक्या लहान मुलीवर सैनिकांनी सामूहिक बलात्कार केला होता. त्याच्यावर पिक्चरपण निघाला होता. सोफिया लॉरेनने आईची भूमिका केली होती.'

'हो; पण त्यात अतिप्रसंगाचे वर्णन चार ओळींत केलं होतं. चारशे ओळींत नव्हतं. मला आणखीन एका प्रश्नाचं उत्तर द्या. हाच प्रसंग तुमच्या मुलीवर ओढवला असता तर तो प्रसंग तुम्ही लोकांना खुलवून सांगितला असता? तुमच्याच शब्दांत सांगायचं म्हटलं तर ते वास्तववादी चित्र लोकांसमोर उभं केलं असतं का?'

'शट अप, यू आर क्रॉसिंग युवर लिमिट.'

तेवढ्यात धाडकन दरवाजा उघडून सदा आत आला. 'तू तुरुंगात होतास ना?'



'माझी सजा संपलीय.'

'म्हटलं, तुमच्या कादंबरीतल्या कुठल्याही पात्राला अस्वस्थ ठेवूनच तुमचं समाधान होतं का, असं विचारावं. बाबूजी, मला ब्राह्मण कुळात जन्माला घातलंत. एखादा भिक्षुकीचा धंदा करायला लावला असतात तर बरं वाटलं असतं. पण नाही मला सट्टेवाल्याकडे नोकरीला ठेवलंत. हा सदानंद जोशी मुंबई युनिव्हर्सिटीचा फर्स्ट क्लास ग्रॅज्युएट, नोकरी काय करतोय तर सट्ट्याचे आकडे लिहितोय.'

'देशात सुशिक्षित युवकांची काय स्थिती आहे, हे मला तुझ्या भूमिकेतून लोकांसमोर मांडायचं होतं.'

'माझी दयनीय अवस्था पाहून तुम्हाला आनंद मिळत होता?'

'तसं हवं असेल तर म्हण'

'बाबूजी, मी आणि विभा एकमेकांवर लुब्ध होतो; पण ते प्रेम कधी व्यक्त नाही करू शकलो.'

'कारण माझीच तशी इच्छा होती. कथेत प्रेमापेक्षा विरहाच्या कथा चांगल्या रंगतात.'

'विभा नानांसाठी औषध आणायला गेली होती. बारक्याने अंधाराचा फायदा घेतला आणि त्या कोवळ्या जिवावर अमानुष बलात्कार केला. ती औषध घेऊन का नाही आली म्हणून बघायला नानांनी मला पाठवलं. म्युन्सिपालटीच्या शाळेच्या परिसरात मला विभा असहाय अवस्थेत सापडली. बिचारी अश्रूंच्या थारोळ्यात विव्हळत होती. मीच तिला उचलून घरी आणलं.

बारक्याचं कुकर्म मला समजलं. माझा माझ्यावरचा ताबा सुटला. राग डोक्यात थैमान घालत होता. तडक निघालो बारक्याच्या शोधात. साला घरात दारू पीत बसला होता.

लाथेनी त्याचा दरवाजा उघडला. पहिल्यांदा गुरासारखा झोड झोड झोडला. त्याची बायको मला सांगत होती, त्याच्याऐवजी तू मला मार. त्याला माफ कर.

माफ करणारा मी परमेश्वर नव्हतो. त्याची दारूची बाटली उचलली. अर्धी फोडली आणि उरलेली त्याच्या पोटात घुसवली. रक्ताच्या चिळकांड्या उडाल्या. माझा चेहरा, कपडे रक्ताने भरले. बारक्याची आतडी बाहेर आलेली

पाहून माझं काळीज थंडावलं.

बारक्याची बायको तिथेच बेशुद्ध झाली. चाळीतले सगळे लोक जमा झाले. मी सरळ पोलीस स्टेशनवर गेलो आणि सरेंडर झालो.

'तू कायदा हातात का घेतलास?' जजसाहेब तिथे आले आणि म्हणाले.

'या जजसाहेब, बरं झालं तुम्ही आलात. सात वर्षांची तुम्ही मला सजा सुनावलीत.'

'कायद्यात तशीच तरतूद आहे. तू गुन्हा कबूल केलास. बचावाचा प्रयत्न पण नाही केलास.'

'चुकलं माझं जजसाहेब.'

'काय?'

'बारक्याला मारण्याआधी त्याच्यासमोर मी त्याच्या बायकोवर बलात्कार करायला हवा होता.

'त्यानं काय झालं असतं.?'

'मरणापूर्वी त्याच्या चेहऱ्यावर मला यातना दिसल्या असत्या.'

'तुझ्यावर आणखीन एक गुन्हा दाखल झाला असता. तू सरळ विभाच्या वतीने पोलिसात तक्रार दाखल करायला हवी होती.'

'मग काय झालं असतं?'

'पोलिसांनी बारक्याला पकडलं असतं. गुन्हा दाखल झाला असता. केस चालली असती.'

'जजसाहेब, उद्या बारक्याला सजा झाली असती. पण काय विभाला आपली अब्रू परत मिळाली असती? तिच्या मानसिक जखमा भरून आल्या असत्या? समाजात ताठ मानेने वावरता आलं असतं?

कदाचित आरोपीच्या वकिलांनी विभाला पिंजऱ्यात उभं करून प्रश्न विचारले असते. तो अतिप्रसंग घडला तेव्हा बारक्याने कुठले कपडे घातले होते. ती घटना घडली तेव्हा किती वाजले होते? नऊ का सव्वानऊ?

तिचे रक्तानी माखलेले कपडे दाखवून हे कपडे तुझेच का? जजसाहेब, हे प्रश्न म्हणजे स्त्रीला तुमच्या कायद्याने दिलेल्या मरणप्राय यातना. तुम्हाला हवा असतो पुरावा. साक्षीदार गीतेवर हात ठेवून धडधडीत खोटे बोलतात. ते तुम्हाला माहीत असतं; पण काय करणार. तुम्ही हतबल असता.

उद्या या केसमध्ये परिस्थितीजन्य पुरावा न मिळाल्यामुळे आणि



साथीदारांचे बयान लक्षात घेऊन बारक्या बा-इज्जत बरी झाला असता. विभासारख्या आणखीन एका भक्ष्याच्या शोधात. तुमचा कायदा दुर्बल आहे जजसाहेब.'

'सदा, तू म्हणतोस ते अगदीच चुकीचं नाही'

'जजसाहेब, माझ्या विभाला लेखक महोदयांनी आत्महत्या करायला भाग पाडलं, कारण ती त्यांची मुलगी नव्हती. त्यांनी आपल्या कादंबरीतल्या प्रत्येक पात्रावर अन्यायच केला आहे.'

रात्रीचे दोन वाजले होते. माझी मुलगी दीपा आली आणि म्हणाली, 'बाबा किती रात्र झालीय. इथे एकटेच बसून काय करताय?' मी क्षणभर दीपाकडे विभाच्या रूपात पाहिलं आणि माझ्या डोळ्यांत पाणी तरळलं.

■

# बकुळीची फुलं

तुळशीबागेच्या कोपऱ्यावर तिची नि माझी दृष्टादृष्ट झाली. आमच्या दोघांच्या नजरेत एक प्रश्नचिन्ह उभं राहिलं. मी चाचरत विचारलं,

'तू सुजी, सुजाता!' माझं बोलणं मध्येच तोडून सुजाता विस्मित मुद्रेने म्हणाली.

'तू सौरभ...'

'अंहं. मी ठोंब्या' माझ्या ठोंबरे नावाचं ठोंब्या असं अपभ्रंश करणारी या जगातली एकमेव व्यक्ती म्हणजे सुजाता.

'अरे पण तू पाक युद्धात....'

'मी जिवंत आहे. ठणठणीत. मी काय तुला भूतबीत वाटलो की काय?'

'हे बघ, मला भोवळ आल्यासारखं झालंय. मी इथे जवळच राहते. आपण घरी जाऊ या. रिक्षानीच जाऊ, माझ्या पायात त्राण राहिले नाही.'

आम्ही रिक्षाने सुजाच्या घरी गेलो.

सौरभ मुंबईला रूपारेल कॉलेजला बी.ए. च्या शेवटच्या वर्षाला होता. त्याच वर्षी सुजाताने ॲडमिशन घेतली. ती कुठल्या तरी दुसऱ्या कॉलेजातून आली होती. सुजाता हँडलूम हाउसमध्ये नोकरी करत होती. नोकरी



करणाऱ्यांना ते कॉलेज सोयीस्कर होतं.

सौरभ म्हणजे मस्त कलंदर. बघता बघता त्यांची दोस्ती जमली. आणिक एक व्यक्ती मैत्रीत गुंफली गेली ती म्हणजे श्रीकांत जोशी.

श्रीकांत अभ्यासू तर सौरभ उडाणटप्पू. सुजाता मात्र 'सो सो.'

सुजाता म्हणजे मूर्तिमंत लावण्य. असं वाटत होतं, अजंठाचं एखादं लेणं सजीव होऊन आलं असावं. गोरीपान, निळेशार डोळे, घनदाट केस. त्यांना लाभलेली पिंगट छटा. हसण्यापेक्षा ती खिदळत असे. तिच्या गालातल्या खळ्यांमध्ये वारा गिरकत असे. ती कोठेही असली तरी मुलांच्या नजरा तिच्याभोवती पिंगा घालीत.

सौरभ एन.सी.सी.मध्ये ग्रुप लीडर होता. अगदी रांगडा. त्या वर्षी 'रिपब्लिकन डे'च्या परेडसाठी त्याची निवड झाली. हा त्याचा आणि कॉलेजचा गौरव होता.

सौरभ आणि सुजाताची जोडी हा चर्चेचा विषय होता. त्यांची जवळीक मैत्रीची सीमा ओलांडून गेली होती. त्या नात्याला नाव मिळालं नव्हतं. एक अव्यक्त आकर्षण रुजलं होतं.

सुजाता, सौरभ, श्रीकांत यांचं त्रिकूट कॉलेजमधल्या कॅन्टीनमध्ये चकाट्या पिटताना दिसत असे. अर्थात बिल सुजाता देत असे; कारण ते दोघं बेकार होते.

दर एक तारखेला सौरभ न चुकता हँडलूम हाउसमध्ये जात असे. त्यांचं लंच एखाद्या शेरे पंजाबमध्ये होत असे. शिवाय एखादी छोटी-मोठी भेट सुजाता आवर्जून देत असे.

बी.ए. झाल्यावर सौरभ एन.डी.ए.मध्ये सिलेक्ट झाला. त्याच्या करिअरची गाडी झेप घेण्यास सज्ज झाली. दुःख एकच होतं- सुजातापासून दूर जाण्याचं.

खडकवासल्याला जाण्यापूर्वीची संध्या त्यांनी गिरगाव चौपाटीवर साजरी केली. शब्द फुटत नव्हते. जणू ते पोरके झाले होते. वाळूवर बोटांनी काही तरी चित्राकृती काढायच्या, त्यात अर्थ शोधायचा, मग त्या पुसून टाकायच्या, असा नेत्रपल्लवीचा खेळ चालला. मावळती अंधुकली. दोन जिवांनी निरोप घेतला. जाता जाता सौरभनी सुजाताच्या केसात बकुळीचा गजरा माळला.

सौरभ एन.डी.ए.मधून पास आउट झाला. आता तो कॅप्टन सौरभ ठोंबरे होता.

दुर्दैव असं की पाकिस्तानशी भारताचं युद्ध सुरू झालं. सौरभचं पोस्टिंग सीमेवर झालं. सुरुवातीला काही दिवस संपर्क राहिला. नंतर पार तुटला.

सुजाताला हुंदका आवरत नव्हता. सजल नेत्रांनी तिने विचारलं, 'अरे, युद्धात तू मारला गेलास अशी बातमी पेपरात आली ती कशी?'

'अग तीच तर माझी ट्रॅजिडी आहे. मी माझी ट्रूप घेऊन हिमालयाच्या उत्तर सीमेवरून कूच केले. लढाई गनिमी काव्याची होती. दोन दिवस सतत चालत होतो. थंडी मी म्हणत होती. आडोशाची जागा पाहून आम्ही तळ ठोकला. दोन-चार तासांची विश्रांती मिळाली. आमच्यावर अवचित हल्ला झाला. लढाई निकराची झाली. मी जखमी झालो. जेरबंद झालो. मला बलुचिस्तानजवळ एका कोठडीत रवाना केलं. सगळाच अंधकार. या जगाशी काहीच संबंध राहिला नाही. माझं तारुण्य तुझ्या आठवणी काढत काढत संपलं.'

'मग तिथून तू सुटलास कसा?'

'यू.एन.ओ.च्या एक्स्चेंज ऑफ वॉर प्रिझनर्सच्या प्रोग्रॅमअंतर्गत.'

'मग सुटल्यावर लग्न-बिग्न केलंस की नाही?'

'सुजे, का हा निरर्थक प्रश्न विचारतेस?'

जिच्यासाठी अर्चना केली.  
ईश्वराकडे पुन्हा पुन्हा  
ती मिळाली सहजपणे  
कुणास न मागता.

'माझ्या नशिबात फक्त तिची वाट पाहावी इतकंच लिहिलं होतं.'

'पण ती कुठे आहे, कशी जगते आहे, याचा शोध घेतलास कधी?'

'घेतला ग सुजे, मी दिल्लीला आल्यावर पहिला मुंबईला गेलो. मी एन.डी.ए.मध्ये असतानाच बाबा गेले. मागे उरली आई. मी मृत घोषित होताच तिने डोळे मिटले कायमचे. एका बेवारशी प्रेताला लोकांनी अग्नी दिला. एका शहीद पुत्राच्या मातेला.

मी चौकशी केली तेव्हा कळलं, तुझं श्रीकांतशी लग्न झालं. माझी शेवटची आशापण नष्ट झाली. आता तुला भेटणं म्हणजे तुझ्या संसारात ढवळाढवळ. ते अमानवीय होतं.

'सौरभ, मी तुझी खूप वाट पाहिली. नंतर मला असं वाटू लागलं मी माझ्या घरच्यावर बोझ झालेय. त्यातून ती पेपरामधली बातमी. माझं जग कोसळलं. काही सुचेनासं झालं.

सौरभ, स्त्री कितीही सबला झाली तरी तिला एक आधार लागतो. एक मानसिक आधार. मग तो नवरा असो वा मित्र. त्याच्याविना तिचे जीवन अधुरे आहे. तुझ्या आठवणींपलीकडे माझ्याकडे काहीच नव्हतं.

एकदा श्रीकांत भेटला. त्यांनी मला मागणी घातली. तो माझ्या सौंदर्यावर भाळला असावा. कदाचित अनुकंपेच्या पोटी; पण त्यांनी तसं दाखवलं नाही. लग्नात एखाद्या अपरिचित माणसाला हे तन-मन सुपूर्द करणं म्हणजे निव्वळ जुगार. श्रीकांत ओळखीचा होता. मी नाइलाजाने त्याला हो म्हटलं.

मी श्रीकांतला एक गोष्ट स्पष्ट केली. मी सौरभवर प्रेम करते आणि ते जीवनाच्या अंतिम श्वासाबरोबरच संपेल.

आणिक एक अट घातली, ती म्हणजे माझी डायरी. आपल्या पहिल्या भेटीपासून प्रत्येक घटना त्यात शब्दबद्ध होती. ती डायरी तू कधीही वाचणार नाहीस.'

श्रीकांत म्हणाला, 'अग वेडे, तुझा ठोंब्या तुझ्या स्मृतीत जिवंत आहे. मी तुझं वास्तव आहे. आमच्या दोघांची विश्व वेगळी आहेत. तुझ्या त्या प्रीतदीपावर मी कधीच फुंकर घालणार नाही. तुला वचन देतो तुझी डायरी मी नाही वाचणार.'

'सौरभ'

'अग, तू मला ठोंब्या म्हटलंस तर नाही का चालणार?', सौरभ मध्ये म्हणाला.

'ठोंब्या, प्रत्येक स्त्री आपल्या सुहाग रात्रीची स्वप्ने रंगवत असते. फक्त ती व्यक्त करण्याइतकी ती निलाजरी नसते. मी पण माझी स्वप्ने रंगवली होती. ती आजही शब्दरूपात माझ्या डायरीत सजली आहेत.

मिलनाची रात्र म्हणजे स्त्रीदेहाचा उत्सव. एक अभूतपूर्व अनुभव; लाजरा पण हवाहवासा वाटणारा स्पर्शगंध. श्रीकांतनी माझ्या देहाचा ताबा घेतला. मी त्या क्षणीसुद्धा तुझाच विचार करीत होते. माझा थंडपणा श्रीकांतला जाणवला असावा.

ठोंब्या, ही श्रीकांतशी केलेली प्रतारणा होती. त्याच्यावर अन्याय होता. ती शीलवंतीची लक्षणं नव्हती. माझा उंबरठा मी ओलांडला होता. मी एक कृतघ्न स्त्री होते. चरित्रहीन.'

'बरं का रे ठोंब्या, आमचा संसार व्यवस्थित चालला होता. गृहकार्यात मी दक्ष होते. श्रीकांतला काहीही कमी पडू दिले नाही. त्याची मानमर्यादा, त्याचा आत्मसन्मान तळहाताच्या फोडासारखा जपला. फक्त मनाने मी त्याला वरलं नव्हतं.

नियतीनं आपलं कार्य उरकलं. माझी कूस उजवली. मी मातृत्वाकडे

वाटचाल केली. यशला जन्म दिला. तुझ्या प्रेमामधून एक वाटा बाजूला काढला. तुझ्या आठवणीत यश माझा विरंगुळा होता. माझे लोभस मनशिल्प! यश गुणी होता.'

'होता म्हणजे?' सौरभने दचकून विचारलं.

'तो पण आता स्मृतीत उरलाय. किती हुशार होता तो! खेळात तेवढाच प्रवीण. खूप छान स्विमर. इंग्लिश खाडी पोहण्याची तयारी करत होता.

दोन वर्षांपूर्वीची गोष्ट. यश बारा वर्षांचा होता. स्विमिंगला गेला होता. मला म्हणाला, 'मम्मा, मला चिकन करून ठेव. आल्यावर मी बका-बका खाणार आहे.' पण माझे दुर्दैव! त्याच दिवशी यश अपघाताने टँकमध्ये बुडाला.

श्रीकांतला ही बातमी ऑफिसमध्ये कळली. त्यांनी मला घरी फोन केला. मी दिग्मूढ झाले. मी डायरी वाचत होते. कसंबसं आवरलं नि घराबाहेर बेभान धावले.

आपल्या लेकाचं प्रेत खांद्यावरून नेताना पित्याला काय दुःख होत असेल, याची कल्पना करणं कठीण. क्रियाकर्म करून श्रीकांत आला आणि माझ्या कुशीत लहान मुलासारखा केविलवाणा रडला.

जेव्हा शब्द संपले आणि अश्रू आटले, आम्ही बेडरूममध्ये गेलो. माझी डायरी उघडीच होती. डायरीमधला तुझा फोटो खाली पडला होता. श्रीकांतनी फोटो उचलला. डायरीत ठेवून, डायरी बंद करून माझ्या हातात दिली. मला ओशाळल्यागत झालं. रात्री श्रीकांतच्या छातीवर हात ठेवून मी झोपले. मूक मनानी आम्ही एक-दुसऱ्याचं सांत्वन करत होतो. यश येईल आणि चिकन खाईल, अशी वाट पाहत होतो.'

'सुजे, अग हे ऐकवत नाही ग. मला सांग, श्रीकांत कसा आहे? तो अजून कसा आला नाही?' सौरभ आपले डोळे पुसत म्हणाला.

'तो बेडरूममध्ये आहे.'

'अग, हे आधी का सांगितलं नाहीस? आल्यापासून तो दिसला नाही. आजारी आहे वाटतं?'

सुजाता सौरभला घेऊन बेडरूममध्ये गेली. तिथे श्रीकांत आणि यश दोघांचे फोटो भिंतीवर टांगले होते. दोघांना चंदनाचा हार घातला होता.

'ओह माय गॉड! अग हे कसं आणि केव्हा?'

'काय सांगू तुला. यशची त्यांनी हाय खाल्ली. तो खंगत गेला. त्यांनी अंथरूण धरलं.

श्रीकांतची ट्रान्सफर मुंबईहून पुण्याला झाली. तो कलेक्टर ऑफिसमध्ये



प्रशासकीय अधिकारी होता. औषधोपचारात काही उणीव नव्हती. तीन महिने पडून राहिला. एक दिवस आजार बळावला. तो सीरियस झाला. मी डॉक्टरांना पाचारण केलं. श्रीकांतनी माझा हात हातात घेतला. त्याच्या डोळ्यांच्या कडा ओलावल्या होत्या. शब्दांत एक विलक्षण गहिरेपणाचा भाव होता. तो म्हणाला, 'माझी तुझ्याविषयी काहीही तक्रार नाही. वाईट इतकंच वाटलं की ज्या आवेशात तू सौरभवर प्रेम केलंस त्याचा थोडासा जरी अंश मला मिळाला असता तर बरं वाटलं असतं. तुझं मन मी नाही जिंकू शकलो. पुढच्या जन्मी तुझी आणि सौरभची ताटातूट न होवो अशी प्रार्थना मी करतो. यशच्या रूपानी कदाचित माझी आठवण तुला भेटीत दिली असती; पण आता ते शक्य नाही. माझ्याकडून काही चुकलं असेल....'

'श्रीकांत, तू नको रे असा बोलूस. मला अपराधी झाल्यासारखं वाटतंय. माझंच चुकलं.'

'ये लाडके, आता मला हसून निरोप दे.'

श्रीकांत निःस्तब्ध झाला. मला वैधव्य आलं.

काही वेळ नीरव शांततेत गेला. आसवांना आवर घालून सुजाता म्हणाली, 'तू इथे पुण्याला कसा?'

'मी इथेच सेटल झालोय.'

शेवटी सौरभ उठला आणि म्हणाला, 'येऊ मी?'

'परत आपली भेट?'

'तुला न्यायलाच येईन.'

कळत-नकळत सुजाता सौरभच्या मिठीत आली.

'ए, एकदा मला ठोंब्या म्हण नं.'

सुजातानी वर पाहिलं. भरलेल्या नेत्रांनी, कंपन स्वरात ती म्हणाली, 'ठोंऽऽब्या.'

सौरभनी तिला छातीशी घट्ट आवळलं. त्याचे ओठ तिच्या कापऱ्या ओठांवर स्थिरावले.

सुजाताच्या डायरीतली सुकलेली बकुळीची फुलं आज परत महकली होती.

■

# जगावेगळा

मुंबईचे सुगनमल कॉलेज म्हणजे निसर्गाच्या सान्निध्यात नटलेली एक चित्रकृती. पिंपळ, निलगिरी, सुरू वृक्षांचे मनोरे. छोट्या छोट्या हिरवळी आणि त्यांच्या किनाऱ्यावर हातात हात घालून उभ्या असलेल्या चिरतरुण बोगनवेली. कॉलेजची वास्तू म्हणजे इंग्लंडच्या कंट्रीसाइड शिल्पाकृतीचे अनुरूप उदाहरण. लाल लाल दगडांच्या भिंती, प्रवेशद्वारावर भव्य कमानी, पोर्चेस, स्वागतकक्ष, सर्वच काही मनोहर.

कॉलेजचं पर्व पावसाळ्यात सुरू होत असे. रिमझिम पावसात भिजावं, रोमांचित वाऱ्यावर डुलावं आणि मग रमतगमत प्रवेश करावा असे हे विहंगम दृश्य असायचं.

प्रथम वर्षाची मुलं-मुली काहीशी बावरलेली; पण कुतूहलात मुग्ध झालेली. प्रत्येक जण नवीन नवीन चेहरे पाहण्यात दंग, नव्या ओळखी करून घेण्यास प्रत्येक जण आतुर. अशा मधुरम्य वातावरणात एफ.वाय. आर्ट्सचा क्लास सुरू झाला. शंभर अनोळखी चेहरे तिथे जमले होते. कालांतरानी त्यांची दोस्ती, जवळीक यांची समीकरणं मांडली जाणार होती. पहिलं लेक्चर मराठीचं होतं. प्रा. जोग आले आणि म्हणाले,



'आज आपण अपरिचित आहोत. उद्या एक दुसऱ्याशी निगडित असू. या ओळखींवर आपले संबंध विकसित होतील. गुरू-शिष्य नात्याला किंवा तुमच्या मैत्रीला एक वळण मिळेल. आपुलकीचा किनारा मिळेल. दोन अजाण व्यक्ती एक दुसऱ्याच्या सुखदुःखाचे साथी बनतील. तेव्हा आपण आपला परिचय करून घेऊ या. स्त्रीदाक्षिण्य आपल्या संस्कृतीचे यथार्थ दर्शन आहे. तेव्हा मुलींपासून सुरुवात करू या.'

'मी उज्ज्वला गुप्ते, मी शालिनी परब, मी विजू दिघे' आणि शेवटी नजर खिळली रीमा चिटणीसवर. तिच्याकडे पाहून भिरभिरत्या नजरा स्थिरावल्या. काही जणांचे भ्रूनेत्रसंकेत बघण्याजोगे होते. मुलांनी पिनाकी नाडकरपासून वरुण कुलकर्णीपर्यंत आपली नावे सांगण्याची औपचारिकता पूर्ण केली.

तेवढ्यात एक नुकतंच मिसरूड फुटलेला युवक 'मे आय कम इन' असा गोंधळलेला चेहरा सरांची परवानगी घेऊन आत आला. 'मी प्रकाश मांजरेकर' त्याने स्वतःची ओळख दिली. त्याच वेळेला पिरीयड संपल्याची बेल झाली.

काळ वेगाने धावत होता. दिवस कॅलेंडरच्या तारखा ओलांडून जात होते. परीक्षा झाली. परीक्षेचे टेंशन प्रकाशवर नसावं हे त्याच्या निकालावरून जाहीर झाले. अनेक विषयांत अनुत्तीर्ण झाला. जिथे पास झाला तेथे काठावरचे मार्क. रीमा वर्गात पहिली आली. प्रत्येक प्रोफेसरानी तिचे मनःपूर्वक कौतुक केले.

रीमाच्या घरची परिस्थिती सर्वसाधारण होती. तिने खादी अँड विलेज इंडस्ट्रीमध्ये नोकरी पत्करली. नोकरी करणाऱ्यांसाठी क्लासेसची व्यवस्था होती. रीमा नोकरी करून कुटुंबाला हातभार लावत होती. कुटुंबात आई, बाबा आणि लहान भाऊ मंगेश. मंगेश शिकणारा होता.

प्रकाश हा चांगला चित्रकार होता. क्लासेस बुडवून तो तासन्तास कॉलेजच्या बागेत बसून स्केचेस काढीत असे. तो निसर्गवेडा होता. रंग त्याची दुनिया होती. कुंचला त्याची स्फूर्ती होती. रीमाची आणि त्याची दोस्ती पक्की झाली होती. रीमा त्याच्यासमोर आठ-आठ तास पुतळ्यासारखं बसून पोर्ट्रेट काढून घेत होती. त्यांच्या मैत्रीच्या वेलीवर प्रीतफूल केव्हा उमललं ते कळलं नाही. कॉलेज सुटल्यावर प्रकाश रीमाला घेऊन घरी जात असे. वार्षिक परीक्षा जवळ आल्या. रीमा प्रकाशला म्हणाली-

'तू अभ्यास का करीत नाहीस?'

'माझं मन नाही लागत.'

'अरे पण कसंबसं करून तुला पदवी मिळायला हवीच.'
'माझी पदवी तर तूच आहेस.'
'फाजीलपणा करू नकोस.'
'काय ग ही कागदाची डिग्री मला नोकरी देऊ शकेल?'
'नसेल तर काय तुझी चित्रं तुला नोकरी देणार आहेत?'

प्रकाश नापास होणार हे सूर्यप्रकाशाइतकं स्वच्छ होतं. प्रकाश नापास झाला तसं त्याला शिक्षण पुढे चालू ठेवणं कठीण होतं. वडिलांच्या मृत्यूनंतर त्यांच्या फॅमिली पेन्शनमध्ये आई आणि त्याचा उदरनिर्वाह होत होता. प्रकाश दिवसभर नोकरीसाठी वणवण भटकत असे. किती प्रयत्न झाले; पण यश आसपास भटकले नाही. संध्याकाळ झाली की त्याचे पाय आपोआप कॉलेजकडे वळत. रीमासाठी एक आंतरिक ओढ मनात अंकुरली होती.

एक दिवस हतबल होऊन तो म्हणाला.
'रीमा, नोकरी मिळणं किती कठीण आहे ग!'
'अरे प्रयत्न करीत राहा. तुला नोकरी नक्कीच मिळेल.'
'खोटा दिलासा' प्रकाश मनात म्हणाला.

अचानक तीन-चार दिवस झाले, प्रकाश गायब झाला. रीमाला काळजी वाटू लागली. एके दिवशी रीमा, मीना गानू, जयू दोंदे व वरुण कुलकर्णीला घेऊन रीमा प्रकाशच्या घरी गेली. बघितलं तर प्रकाश मुंडन करून बसलेला आणि आईच्या फोटोला हार चढवलेला होता.

'हे अचानक असं' रीमाने विचारले.

'आईला अचानक हृदयविकाराचा झटका आला. त्या दिवशी मला यायला उशीर झाला. आई जेवणासाठी माझी वाट पाहत होती. मी दरवाजा ठोठावला; पण प्रतिसाद नाही मिळाला. शेवटी व्हेंटिलेटरमधून पाहिलं. आई पलंगावरून खाली पडली होती. दोन पाट आणि पाणी घेऊन ठेवले होते. आई वाट पाहून गेली. मला मोठं करण्याच्या स्वप्नांचा मागोवा घेत खूप दूर निघून गेली ग.'

काही क्षण नीरव शांतता पसरली. सांत्वनासाठी शब्द अबोल झाले. रीमाला सोडून सारी मित्रमंडळी आपापल्या घरी परतली.

'रीमा, मी पोरका झालो ग. अगदी एकटा पडलो.'
'प्रकाश तू असं का म्हणतोस? तू एकटा कुठे आहेस?'
'तुझ्या जीवनात माझं अस्तित्व नाही का?'



'तुझ्या या प्रवासात मी प्रत्येक क्षणी तुझ्याबरोबर आहे. मला सांग तू आता काय करायचं ठरवलं आहेस?'

'अग माझ्या मनात एक कल्पना थैमान घालत आहे. कळत नाही, काय योग्य आणि काय अयोग्य.'

'मग ती कल्पना माझ्याबरोबर शेअर करायला काही अडचण आहे का?'

'नाही रीमा, आता माझ्या धाडसात प्रत्येक वळणावर तू माझ्यासोबत असशील.'

'अग, चार महिन्यांनी जहांगीर आर्ट गॅलरीमध्ये एक मोठं प्रदर्शन भरणार आहे. देशविदेशातून चित्रकार रसिक येण्याची शक्यता आहे.'

'बरं मग.'

'मी तिथे फुटपाथवर माझी पेंटिंग्ज विकायला ठेवायचं म्हणतोय आणि बरं का रीमा प्रदर्शनाचे उद्‌घाटन 'लंडन स्कूल ऑफ आर्ट्स'चे डायरेक्टर मॅन्युअल डेव्हिड करणार आहेत. माझं अंतर्मन सांगतेय यामध्ये मला प्रतिसाद चांगला मिळेल.'

'अरे मग कर की.'
'रीमा हे थोडंस खर्चिक काम आहे.'

'चार-पाच हजाराचं खर्च अपेक्षित आहे. सगळी चित्रं कॅन्हवासवर काढणार आहे.'

रीमा दोन-चार मिनिटं विचार करून म्हणाली.

'हे बघ प्रकाश, मी आता जे काही सांगणार आहे यात तुला संकोच वाटेल; पण तोच मला सुगम मार्ग वाटतो.'

'काय ते ऐकून तर घे.'

'मी तुला उद्या माझ्या दोन सोन्याच्या बांगड्या देईन. त्या घेऊन तू कोपऱ्यावरल्या मदनलाल मारवाड्याकडे जा. त्या गहाण ठेव आणि तुझे 'ऑपरेशन फुटपाथ' सुरू कर.'

'अग पण तू घरी काय सांगशील?'
'मी ते बघून घेईन.'
'रीमा, माझ्याकडे शब्द नाहीत ग. किती मोठी जबाबदारी घेतेस.'
'प्रकाश- तुझ्या प्रत्येक सुख-दुःखावर माझा अधिकार आहे.'

प्रकाशनी मदनलाल मारवाड्याकडून पैसे आणले. आता तो देहभान, भूक-तहान विसरून कामास लागला. प्रदर्शनाच्या दोन-चार दिवस आधी

रीमा सुटी घेऊन प्रकाशबरोबर राहिली. मिस्टर डेव्हिडनी उद्घाटन केले. बऱ्याच उच्चभ्रू लोकांची गर्दी झाली. प्रकाश आणि रीमा आशाळभूतपणे त्यांच्याकडे पाहत होती.

मि. डेव्हिड जहांगीरमधून जेव्हा बाहेर पडले तेव्हा त्यांचे लक्ष समोरच्या फुटपाथवर गेले. ते तिथे कुतूहलाने गेले. त्यांचा त्यांच्या डोळ्यांवर विश्वास बसेना. इतकी सुंदर कलाकृती रस्त्यावर! प्रकाशनी रीमाची आठ-दहा पोर्ट्रेट काढली होती. त्यांना 'मूडस' असं टायटल दिलं. डेव्हिडनी ती सगळी पोर्ट्रेट्स विकत घेतली. त्या जिवंत कलाकृतींचे मनःपूर्वक कौतुक केलं आणि प्रकाशला त्यांनी 'लंडन स्कूल ऑफ आर्ट्स'मध्ये दोन वर्षांच्या डिप्लोमा कोर्ससाठी ऑफर दिली.

दुसऱ्या दिवशी ही बातमी साऱ्या वर्तमानपत्रांत पहिल्या पानावर झळकली. प्रकाश एकदम प्रसिद्ध झाला. फोटोग्राफर्सनी प्रकाशबरोबर रीमालापण फोटोत कैद केलं.

जाण्यासाठी थोडीफार पैशाची आवश्यकता होती. बांगड्या सोडवायच्या होत्या; पण रीमानी मनाई केली. प्रकाश मारवाड्याकडे गेला आणि दोन वर्षांचे आगाऊ व्याज भरून आला.

विरहाची वेळ, ताटातुटीची वेळ. दोघांनी अलिंगनात आपल्या भावी संसाराची स्वप्ने रंगविली. आता प्रत्येक क्षण एक दुसऱ्याच्या आठवणीत काढायचं ठरविलं. प्रकाशचे विमान हवेत झेपावले.

प्रकाशचा आणि रीमाचा पत्रव्यवहार ऑफिसच्या पत्त्यावर चालू होता. पत्रात या सगळ्या गोष्टी व्यक्त झाल्या, ज्या शब्दांना प्रत्यक्षात सांगता आल्या नाहीत.

दोन वर्षांचा काळ चुटकीसरशी निघून गेला. आता प्रकाशच्या परतीची वेळ आली. रीमा पदवीधर झाली होती. आपल्या दुल्हेराजाची वाट पाहत होती.

रीमाने प्रकाशशी लग्न करण्याचा मानस घरातल्या लोकांना सांगितला. आंतरजातीय विवाह असल्यामुळे तिला फारसा चांगला प्रतिसाद मिळाला नाही; पण विरोधही नाही झाला. ही गोड बातमी तिने प्रकाशला पत्राद्वारे कळविली. त्याच्या उत्तराची ती चातकाप्रमाणे वाट पाहत होती.

दिवस गेले, आठवडे गेले; पण प्रकाशकडून काहीही प्रतिसाद आला नाही. रीमाच्या अनेक पत्रांची धड उत्तरं पण आली नाहीत. रीमा हवालदिल झाली.

वैरी न चिंती ते मन चिंती. प्रकाश मला टाळत तर नाही ? दुसरं मन सांगत होतं- नाही प्रकाश तसा नाही. या दोन मनांच्या अंतर्द्वंद्वात रीमाची ससेहोलपट



झाली. सहा महिने उलटले. प्रकाशकडून बोटभर चिट्ठी नाही आली.

तिचा भाऊ मंगेश तिला म्हणाला.

'हे बघ ताई, तू कुठवर प्रकाशची वाट पाहाशील? एक तर काही विपरीत झालं असेल किंवा तो तुला टाळत असावा.'

'असं नको रे बोलूस.'

'ताई त्याची येण्याची वेळ टळून गेली आहे. तुझ्या पत्राला त्याने उत्तर नाही दिलं. अग तू आईकडे बघ तुझ्या चिंतेत ती दिवसेंदिवस खंगत चालली आहे. काय अधिकार आहे तुला, तिला तीळतीळ मारण्याचा?'

'ऐक! अरुण प्रधान यांचं तुला स्थळ सांगून आलंय. लोक श्रीमंत असूनही सुसंस्कृत आहेत. ताई, अग तुझं अहित आम्ही चिंतू का?'

'भाऊ, मला थोडीशी मुदत दे. माझ्या जीवनाचा निर्णय घ्यायचाय.'

'अवश्य, पण ताई एकच सांगतो, प्रकाश नावाच्या मृगजळामागे धावू नकोस.'

रीमाने प्रकाशला तार पाठवून त्याचे उत्तर मागितले. दुर्दैव असे की त्यालापण प्रतिसाद मिळाला नाही. रीमाच्या स्वप्नांचे विश्व तिच्या आसवात वाहून गेले. तिने लग्नास होकार दिला आणि अरुणचा प्रस्ताव स्वीकारला.

रीमा आणि अरुणच्या लग्नाचा सोहळा दादरच्या एका भव्य हॉलमध्ये संपन्न झाला. मान्यवर लोकांची उपस्थिती हे लग्नाचं मोठं आकर्षण होतं. विजेची रोषणाई अशी होती जणू काही नेत्रोत्सव. देखण्या मुला-मुलींचा मेळावा, धावपळ, गोंधळ भरीला संतू मोऱ्यांची सनई आणि बँडवाल्यांची डिस्को धून गाणी. सारा माहोल मंगलमय झाला होता.

स्वागत समारंभात रीमाचे लोभस लावण्य आणि अरुणचं उमदं व्यक्तिमत्त्व सगळ्यांना आकर्षित करीत होतं. त्याच वेळी हॉलमध्ये प्रकाशचा प्रवेश झाला. अनेकांचे डोळे विस्फारले. रीमाच्या मैत्रिणींचा घोळका गप्पा मारण्यात दंग होता. तेवढ्यात उज्ज्वलाचे लक्ष गेले. 'प्रकाश' तिने हाक मारली.

'हाय उज्ज्वला' प्रकाश खिन्न मनाने बोलला.

'काय रे कधी आलास?'

'आजच लंडनवरून आलो.'

'यायला खूप विलंब केलास.'

'काय सांगू तुला माझी कर्मकहाणी.' हे बघ प्रथम मी रीमाचे अभिनंदन करून येतो; मग बोलू.'

प्रकाशला बोहल्यापाशी जाताना मंगेशनी पाहिलं. त्याच्या मनाचा तोल

सुटला. तो बेकाबू झाला. त्याने त्याची गचांडी पकडून त्याला हॉलबाहेर घालवलं. हा काय प्रकार आहे, कुणालाच कळलं नाही. सगळ्या समारंभाचा विचका झाला. बघता बघता भयावह वातावरण निर्माण झालं. रीमा हा सर्व प्रकार डबडबलेल्या डोळ्यांनी पाहत होती. कुणीतरी भाऊला आवरा रे म्हणून आवर्जून सांगत होती.'

'रीमाची आज सुहागरात्र होती. मीलनाची रात्र. नवऱ्या-नवरीने एकमेकांना जाणून घेण्याची रात्र. सगळ्या उत्साहावर जणू विरजण पडले होते. अरुणची खोली सजली होती, महकत होती न जाणे; पण सर्वत्र अवकळा पसरली होती. अरुण रीमाला घेऊन टेरेसवर गेला. समोर एक खुर्ची ठेवली होती. रीमा भीत भीत आत आली. अरुणने तिला बसायला खुणेनेच सांगितलं. पाच-दहा मिनिटे कुणीच काही बोललं नाही. वादळापूर्वीची ती भयाण शांतता.

अरुण गहिऱ्या आणि भारी आवाजात आवंढा गिळून म्हणाला.

'हे बघ रीमा, झाला गेला प्रकार तो योग्य नव्हता. आपल्या संसाराची मुहूर्तमेढ कोसळली. आपलं लग्न एक सार्वजनिक विषय झाला. यात मी तुला दोष देत नाही. पण असं वाटतंय हे लग्न तुझ्यावर थोपलं गेलं. माझी संसाराची परिकल्पना म्हणजे दोन जिवांची निर्व्याज मैत्री, एक दुसऱ्याच्या विश्वासात गुंफलेली. आपण आपली सुहागरात्र एका वेगळ्या स्वरूपात साजरी करू या.'

'आपण आपल्या आयुष्यातले सर्व प्रसंग, सर्व घटना एक दुसऱ्यांना मनमोकळेपणानी सांगू या. आपल्यात जे काही गुण-अवगुण आहेत, त्यासकट आपण एक दुसऱ्याला स्वीकारू या.

'मला सांग, हा प्रकाश कोण? भाऊनी त्याला बेइज्जत का केला? हे तू सगळं प्रामाणिकपणे सांग. तो प्रकाश जर तुझा प्रियकर असेल तर तसं सांग. मला वाईट वाटणार नाही. कोणावर प्रेम करणं हा काही गुन्हा नाही. मला हे पण जाणून घ्यायचंय, आजच्या घटकेला त्याचं तुझ्या जीवनात काय स्थान आहे?'

रीमाच्या मनाची अवस्था दयनीय होती. अरुण केवढा दिलदार आणि मोठ्या मनाचा होता. त्याला खरं काय सांगू? मी काही लपवून ठेवलं तर ती त्याची प्रतारणा होईल. आज त्याच्या नावाचं मंगळसूत्र मी बांधले आहे.

रीमाने मनात एकवीरादेवीची प्रार्थना केली- 'कुलस्वामिनी मला खरं सांगण्याचं धैर्य दे!' मग तिनं अरुणला पूर्व इतिहास सविस्तर सांगितला.

एक निःस्तब्ध शांतता वातावरणात पसरली. दोघेही आपल्या चिंतनात मग्न होते. अरुण म्हणाला



'रीमा, प्रकाश तुझ्या जीवनाचा हिस्सा म्हण किंवा किस्सा म्हण, तो आजही आहे. तो तुझा अतीत असला तरी जन्मभर तुझ्या वर्तमानात डोकावणार आहे.'

'अरे तो माझा भूतकाळ होता.'

'काही बोलू नकोस. मी परिस्थिती समजतो. तुझ्या व्यथांना मी न्याय मिळवून देईन. आपण प्रकाशला भेटू या. तो जर या परिस्थितीत तयार असेल तर मी तुझं लग्न त्याच्याशी लावून देईन. प्रकाशची अमानत म्हणून तुला जपीन. तुझ्या कौमार्याचे रक्षण मी करीन.'

रीमाच्या जीवनात काय विलक्षण मोड आला. एकीकडे प्रकाश, दुसरीकडे अरुण. किती जीवघेणी ओढाताण ही! कसा हा रचला गेला तिच्या भावनांचा तमाशा?

अरुण पुढे म्हणाला-

'आपण पती-पत्नी आहोत किंवा असं समज आपण पती-पत्नीचा मुखवटा ओढलाय. आपण दोघे मिळून प्रकाशला विनंती करू. जसं तू मला प्रामाणिकपणे सर्व काही सांगितलंस तसा तुलाही अधिकार आहे माझा भूतकाळ जाणण्याचा.'

'तुम्ही नाही सांगितलं तरी चालेल.'

'नो नो माय डियर. मी तुला माझे अतीत पडदा सारून दाखविणार आहे. थोडंसं मन घट्ट कर.'

'रीमा, सत्य हे आहे की तू माझ्या जीवनातली पहिली मुलगी नाहीस. माझ्या हृदयावर आणि कोणाचा तरी अधिकार आहे.'

'मग हे लग्न करण्याचे प्रयोजन?'

'तेच तेच सांगायचं आहे मला. जीवनाची एक परिभाषा आहे. जे हाती येतं ते नैराश्य आणि जे शोधूनही न मिळतं, त्याचंच नाव जीवन आहे. मग आपण त्या परिस्थितीशी तडजोड करतो. तुझं नि माझं लग्न या तडजोडीपोटी झालंय.'

'जाऊ द्या हो. मला एक सांगा, ती नशीबवान कोण आहे?'

'नशीबवान वा कमनशिबी मला कल्पना नाही.'

'काय नाव तिचं?'

'सलमा ! सलमा खान.'

'म्हणजे मुसलमान.'

'का मुसलमान प्रेयसी असू शकत नाही?'

'नाही, मी सहज म्हणाले.'

'रीमा, सलमा माझ्या कॉलेजची डेमॉनस्ट्रेटर होती. माझ्यापेक्षा पाच वर्षांनी मोठी होती.'

'मग तुमचं प्रेम कॉस्मिक होतं का फॅसिनेटिंग, का काहीतरी जगावेगळं करून दाखवण्याची जिद्द होती?'

'माझ्या मताप्रमाणे प्रेम दोन प्रकारचे असते, एक मानवी आणि एक पाशवी. मी इतकंच जाणतो आमचं प्रेम मानवतेला अनुरूप होतं.'

रीमा एक दीर्घ उसासा घेऊन म्हणाली. 'एकंदरीत आपलं लग्न म्हणजे परिस्थितीशी एक समझोता आहे.'

'खरं सांगायचं तर हो. रीमा आता रात्र खूप झालीय. आपण झोपू या.'

'नाही मी जोवर सलमाची पूर्ण कहाणी ऐकत नाही, तोवर मला झोप नाही येणार. मला अगदी पहिल्यापासून सांगा.'

'मी बी.एस्सी. फायनलला होतो तेव्हा सलमा कॉलेजात नोकरीला लागली. जेव्हा ती प्रथम वर्गात आली तेव्हा सगळ्यांचे डोळे विस्फारले. मला वाटलं ती आमच्या वर्गातली नवीन ॲडमिशन. मला तर शीळ घालण्याची अनावर इच्छा झाली. सलमानी तिचा परिचय दिला.'

'सलमा इतकी गोरीपान होती की पौर्णिमेचं चांदणं. पिंगट केस, सुबक बांधा. तिच्या बोलण्यात एक विलक्षण आब होती. प्रत्येक शब्द तिच्या ओठांतून शृंगारून बाहेर पडायचा. सगळ्यात आश्‍चर्याची गोष्ट म्हणजे सलमा मराठी अस्खलित बोलायची.

सलमाबद्दल माझ्या मनात एक आकर्षण निर्माण झालं. ते का झालं कशासाठी झालं, याची उत्तरं आजही माझ्याकडे नाहीत. मी डिफिकल्टीचा बहाणा करून सलमाकडे जात असे. प्रॅक्टिकल्समध्ये सलमा माझी विशेष काळजी घ्यायची.

एके दिवशी एक भयानक बातमी कानांवर आली. माहीम इलाक्यात कुणीतरी सलमावर हल्ला करण्याचा प्रयत्न केला. माहीम रेक्लमेशनमध्ये तिचा पत्ता मी हुडकून काढला. मला पाहून सलमा आश्‍चर्यचकित झाली.

'ये अरुण ये. आज तू इथे कसा भटकलास?' ती म्हणाली.

'मॅडम दोन-तीन दिवस आपण कॉलेजात नाही आलात आणि काहीशी विचित्र बातमी कानांवर आली. तेवढ्यात तिची अम्मी बाहेर आली.

'अम्मी यह अरुण है, मेरा विद्यार्थी.'



'आदाब' मी म्हणालो.

'आदाब' अम्मीनी प्रत्युतर दिले.

सलमावरचा हल्ला तिच्याच नातेवाइकांनी केला होता. प्रॉपर्टीविषयी काही वैमनस्य होतं म्हणे. सुदैवाने सलमा वाचली.

मी अम्मीला म्हणालो, 'आपकी मैं एक इजाजत चाहता हूँ. हे प्रकरण निवळेपर्यंत मी सलमाला माझ्या कारमधून सोडीन. मी वांद्रे येथे राहतो आणि तुमचं घर माझ्या वाटेवरच आहे.'

अम्मीने खूश होऊन मला परवानगी दिली. अम्मीला तर मी फरिश्ता वाटलो. एक कप गरमागरम चहा पिऊन मी निरोप घेतला.

'खुदा हाफीज, अम्मीजान.'

'खुदा हाफीज.'

सलमाला लिफ्ट देण्याच्या निमित्ताने आमच्यात जवळीक निर्माण झाली.

कॉलेजमध्ये गॅदरिंग आलं. रात्री घरी यायला रात्रीचे दहा वाजले. मी सलमाला गळ घालून म्हणालो.

'मॅडम, आपण वरळीला हॉटेलात डिनर घेऊ, तुम्ही नको म्हणू नका. सलमानी आढेवेढे न घेता होकार दिला.

आम्ही डिनर मागवलं, पण खाण्यात लक्ष नव्हतं. 'मॅडम, आज खूप गप्पा मारायच्यात.'

'का गेल्या सहा-आठ महिन्यांत गप्पांचे विषय संपले नाहीत वाटतं? तू आता अभ्यासावर लक्ष केंद्रित कर.'

'माझं लक्ष लागत नाही, त्याला मी काय करू?'

'ते माझ्यापण लक्षात आलं आहे. प्रॅक्टिकल्समध्ये तू किती चुका करतोस! तुझ्याविषयी मला चिंता वाटते.'

'नुसतीच चिंता?'

सलमाची नजर झुकली. ती कुठल्यातरी अवघड परिस्थितीत फसली.

मी विचारांच्या विरुद्ध पोहण्याचा प्रयत्न करीत होतो. पण मनातले विचार ओठांवर आदळून माघारी फिरत होते. मी आमच्या संबंधांना आकार देण्याचा प्रयत्न करीत होतो; पण याची परिणती म्हणजे संबंधांना तडा तर जाणार नाही, अशी कल्पित भीती मनात वावरत होती. या विचारांची कोंडी मला असह्य होत होती. मी मनाचा हिय्या करून म्हणालो,

'मॅडम, मी माझ्याच विचारांच्या वादळात सापडलोय.'

'अरे मग बोल नं.'

'आपण म्हणालात माझ्याविषयी तुम्हाला चिंता आहे, ही चिंता कुठून निर्माण झाली? जवळीक आत्मीयता आहे का त्याहून त्याचा अर्थ अधिक आहे?'

'तुला काय म्हणायचं आहे मला समजलं नाही. तू अलंकारिक बोलू नकोस स्पष्ट सांग.'

'पण त्याचा तुम्हाला राग आला तर?'

'नाही येणार बी शुअर.'

'मॅडम, माझं अभ्यासात लक्ष लागत नाही याचं एकमेव कारण आपण आहात. मला वाटतं मी तुमच्या प्रेमात पडलो आहे.'

'तू तुझ्या मर्यादा ओलांडतोयस.'

'आपणच म्हणालात, स्पष्ट बोल. मी माझे विचार निर्बंध मांडतोय. हे काल सत्य होते, आजही सत्य आहे आणि उद्याही असणार ते म्हणजे माझे प्रेम. मी तुमच्यात अजंठा- वेरुळचं सौंदर्य पाहत आहे.

'तुला नाही वाटत तू पातळी सोडून बोलतोयस.'

'मॅडम, त्या निर्जीव चित्राकृतीत ज्यांना शारीरिक आकर्षण वाटते त्यांच्या दृष्टीत दोष असतो. त्या पवित्र, निरागस सौंदर्याची त्यांना अभिरुची नसते. ती लेणी म्हणजे नयनऋण आहेत.

मॅडम, प्लीज मला समजून घ्या, माझ्या मनाचा ओलावा जाणून घ्या.

'अरुण ज्या गोष्टी शक्य नाहीत त्याच्या मागे का धावावे?'

'शक्य, अशक्य गोष्टी या प्रयत्नांती कळतात. प्रयत्न न करता हार का मानावी?'

'अरुण किती जगावेगळा आहेस रे, तू जाणतोस मी मुसलमान, तू हिंदू, मी तुझ्यापेक्षा वयाने मोठी. काय आपल्या संबंधांना समाज मान्यता देईल काय? आपले आईवडील या नात्याला सहर्ष स्वीकारतील?'

'मॅडम, आपल्याला समाजाचा बाऊ का वाटतो? माझे आईवडील तुम्हाला सून म्हणून सहज मान्यता देतील. लग्नानंतर तुम्ही तुमचा धर्म अबाधित ठेवा. पाच वेळा नमाज पढा. माझा कसलाही विरोध नसेल.'

'अरुण, मला समजत नाही, तू हे का करतोस? कदाचित माझं शारीरिक आकर्षण तुला मोहित करीत असावं किंवा काहीतरी जगावेगळं करावं अशा विचारांनी तू प्रेरित झाला आहेस.'

'मॅडम, प्लीज माझ्या भावनांना वासनांच्या मलिन दर्पणात पाहू नका. एक



गोष्ट लक्षात ठेवा. आंतरधर्मीय विवाह यापूर्वी अनेक झाले आणि पुढे होतील, मी तुमच्यावर दडपण आणत नाही. तुमची प्रतिमा मी मनात पुजली आहे आणि शेवटपर्यंत पुजणार आहे.'

संवादाची सांगता गंभीर शांततेत झाली. आम्ही दोघेही जड पावली घरी परतलो.

मी नेहमीप्रमाणे सलमाला घरी पोहोचवत असे. कोणी काहीच बोलत नव्हतं. एक दिवस सलमाने साहस केलं.

'अरुण, तुझ्या प्रपोजलचा मी विचार केला. मला थोडासा वेळ हवाय. अब्बूना सांगण्याचं धैर्य होत नाही. संधी मिळताच मी सूतोवाच करीन.'

'थँक यू मॅडम.'

'हे मॅडम मॅडम काय चालवलेस. तुला माझं नाव नाही माहीत?'

'जोपर्यंत आपल्या नात्याला नाव मिळत नाही तोपर्यंत आपण मॅडमच राहणार आणि माझा प्रस्ताव मान्य झाला तर मी सलमा खान ऐवजी सरळ बेगमच म्हणीन.'

'यू स्काऊंड्रल.'

'बट लव्हेबल आणि काय हो मी तुम्हाला अहो जाहो म्हटलं किंवा मॅडम म्हटलं तर काय बिघडेल?'

'हे बघ अरुण, पती-पत्नीला शारीरिक भुकेपलीकडे एक वैचारिक भूकपण असते. त्यासाठी सुख-दुःख वाटून घेण्याची आंतरिक ओढ लागते. हे साध्य करताना तुला मला एक समान पातळीवर यायला हवे.

तुझे अहो-जाहोचे संबोधन तुझ्यात नि माझ्यात एक अस्फुट विभक्तरेखा करील. आपल्या आत्मीय मीलनात ती बाधा होईल. आपण समाजाचे वादळ ओढवून घेणार आहोत. तेव्हा आपल्याला एकत्र येऊन लढावं लागणार आहे. मी काय म्हणतेय तुला समजतं नं?'

'येस डार्लिंग'

'थँक यू माय डियर.'

सलमाचं घर आलं.

'गुड नाइट स्वीट हार्ट.'

'गुड नाइट स्पॉईल्ड रोमिओ.'

'तुम्ही इतक्या पुढे गेल्यावर गाडी कुठल्या वळणावर अडकली?' रीमानी उत्सुकतेने विचारलं.

'रीमा, काय सांगू तुला, एकदा सलमाची अम्मी माझ्या घरी आली.' मला कळवळून म्हणाली.

'देख बेटा, तुमच्या भावना मी समजते. सगळी मानवजात एकच आहे, असा प्रत्येक धर्म सांगतो. पण आपल्या संस्कृती वेगवेगळ्या. समाजाचा रोष ओढवून घेणं सोपं नाही. सारी जिंदगी संघर्षात जाते. शेवटी कळून येतं या डावात सगळेच हरतात, कोणीही जिंकत नाही.'

'सलमा, तुझ्यापेक्षा मोठी आहे. तिला आमच्या बिरादरीत चांगली स्थळं सांगून आलीत. एक तर अमेरिकेत नासामध्ये स्पेस सायंटिस्ट आहे. जोपर्यंत तू नकार देणार नाहीस, तोपर्यंत ती लग्नाला तयार होणार नाही. मी तुझ्यापुढे पदर पसरते.'

रीमा, अम्मीनी माझ्यापुढे दुपट्टा पसरवून सलमासाठी रहमची भीक मागितली. मी एका आईचे तीळतीळ तुटणारे काळीज पाहिले. अपार वात्सल्याचं, ममतेनं ओथंबलेलं काळीज. मी अम्मीला समजावण्याचा अथक प्रयत्न केला; परंतु तो अपुरा पडला.'

'काय तो पलायनवाद नव्हता? आपल्या मनाचा दुबळेपणा लपविण्याचा तो प्रयत्न तर नव्हता?

'नाही, एका मातेच्या झोळीत घातलेली सुखाची ती भिक्षा होती. ते सुख जे मी कवचकुंडलाप्रमाणे जपलं होतं. मी माझ्याच आसवांनी अळवाच्या पानावर कहाणी लिहीत होतो.'

'सलमाच्या अब्बूंनी तडकाफडकी अलिगडला राहायला जाण्याचा निर्णय घेतला. सलमानी दोन पत्रं मला चोरून पाठविली. मी उत्तरं दिली नाहीत, कारण सलमानी तसं मना केलं होतं. त्यानंतर सलमाचे सहा-आठ महिने झाले, न पत्र, न निरोप. हा दैवाचा निर्णय म्हणून मी स्वीकारला आणि तुझ्याशी लग्नास तयार झालो.' रीमा आता रात्र खूप झाली आहे. आपण झोपू या.'

रीमा पलंगावर तर अरुण सोफ्यावर झोपला. अशी झाली त्यांची सुहागरात्र संपन्न! त्या दोघांच्या चेहऱ्यावर एका अपूर्व मैत्रीची झलक दिसत होती.

दुसऱ्या दिवशी रीमा हळद उतरविण्यासाठी माहेरी जायला निघाली. भाऊ न्यायला आला होता. त्याच वेळी रीमाच्या नावाचं एक पार्सल कुरियरनी आलं. सगळ्यांना आश्चर्य वाटलं. पार्सल उघडताच त्यात दोन सोन्याच्या बांगड्या होत्या आणि एक पत्र. रीमाच्या काळजात धस्स् झालं.



प्रिय रीमा,

काल तुझ्या लग्नात जो प्रकार घडला त्याबद्दल मी दिलगीर आहे. तुझ्या सुखाच्या आड येण्याचा माझा मानस नव्हता. मंगेशभाऊ योग्य तेच वागला. आपल्या बहिणीच्या संसारात ढवळाढवळ करणाऱ्याला त्याने योग्य शिक्षा दिली.

रीमा आज आल्यावर तुझ्या बांगड्या मारवाड्याकडून सोडवून आणल्या. तुझ्या उपकाराचे ऋण मी या जन्मी फेडू शकणार नाही.

मी तुला फसवलं हा प्रश्न तुझ्या मनात घुटमळत असेल. साहजिकच मी खुलासा एवढ्यासाठी करतोय, ती परिस्थिती मला पण भेडसावतेय.

रीमा, माझं प्रशिक्षण संपवून मी यायला निघालो. डेव्हिड सरांनी माझी कॅनडात नोकरीची व्यवस्थापण केली. मी विचार केला हिंदुस्थानात जाऊन लग्न करू आणि कॅनडात आपला संसार थाटू. सगळं सरप्राईज करायचं ठरवलं.

डेव्हिड सरांनी मला काही कामानिमित्त आयर्लंडला पाठवलं. तिथे एक इंटरनॅशनल एक्झिबिशन होणार होतं. माझी चित्रकृती त्यात प्रदर्शित करावयाची होती. मी एक सितारा होणार होतो.

डेव्हिडनी मला त्यांची कार दिली. तुझ्या विचारांच्या धुंदीत मी भरधाव जात होतो. दुर्दैव असे की माझा जबरदस्त अपघात झाला. मी एका हॉस्पिटलमध्ये आयसीयूमध्ये काही महिने कोमामध्ये पडून होतो. एक असं जग जे अनभिज्ञ होतं. मग सांग, तुझ्या पत्रांची उत्तरं कशी देणार?'

मी शुद्धीवर आलो आणि ताबडतोब इथे आलो. एअरपोर्टवरून सरळ तुझ्या घरी गेलो. शेजारच्यांनी तुझ्या लग्नाची बातमी दिली. माझं विश्व उद्ध्वस्त झाले!

मनाचा हिय्या करून तुझ्या रिसेप्शनला आलो. मी आता कॅनडाला जातोय. यापुढे चुकूनही तुझ्या आयुष्यात डोकावणार नाही. दुर्दैव आणि काय!

जिच्यासाठी परमेश्वराकडे वारंवार प्रार्थना केली ती मला नाही मिळाली, ज्याला मिळाली ती न मागता मिळाली.

तुझ्यासाठी लग्नाचा आहेर म्हणून एक हजार पौंडाचा चेक पाठवलाय. नको म्हणू नकोस.

तुझ्या पोर्ट्रेटस्नी माझी खोली भरली आहे. त्या डोळ्यांशी, त्या निरागस चेहऱ्यांशी बोलता बोलता उर्वरित आयुष्य निघून जाईल.

एक दुर्दैवी

प्रकाश.

रीमानी पत्र अरुणला वाचायला दिलं. एक पर्व तिथं संपलं. रीमा भूतकाळाला तुडवत वर्तमानात शिरत होती. पत्र वाचून अरुण खिन्न झाला. दुसऱ्या दिवशी रीमा अरुणला म्हणाली.

'आपण हनिमूनला जाऊ या?'

'काय वेड लागलंय की काय?'

'नाही, हनिमूनच्या नावाने आपण अलिगढला जायचं आणि सलमाला भेटायचं.'

'का, कशाला?'

'ते मी नंतर सांगेन.'

रीमा आणि अरुण अलिगढला गेले. कसाबसा पत्ता शोधून काढला. घरात अम्मी होती.

'अम्मी, सलाम वालेकुम.'

'वालेकुम सलाम.'

'अम्मी, सलमा कशी आहे?, 'आओ तशरीफ रखो,' अम्मी म्हणाली.

अम्मी धीरगंभीर झाली. बेटा वो अल्ला को प्यारी झाली.'

'काय म्हणताय तुम्ही? हे कसं घडलं?'

'सलमाचं लग्न आम्ही त्या सायंटिस्टबरोबर ठरवलं' अम्मी म्हणाली.

'अम्मी माझ्या शरीराचं लग्न होईल. माझ्या मनाचं लग्न अरुणशी केव्हाच झालंय. तिचे अब्बू ऐकून घेण्यास तयार नव्हते. शेवटी मीच म्हणाले अरुणला बोलावून घे आणि पळून जाऊन लग्न कर. तिने तुला पत्र लिहिलं; पण त्या पत्राला उत्तर तुझ्या आईने दिलं.'

'आईने?'

'हो बेटा. त्यात तुझं लग्न ठरलंय असं लिहिलं. तुझ्या आयुष्यातून निघून जायला सांगितलं. सलमावर आकाश कोसळलं. ती अबोल झाली, एकटीच आपल्या भावनांशी झुंजत राहिली आणि मग एक दिवशी तिने इहलोकीचा प्रवास संपवला.'

अरुणला आश्चर्य वाटलं. त्याच्याच आईने त्याला धोका दिला.

ते जायला निघाले, तेव्हा अम्मी म्हणाली, 'थांब बेटा.'

ती घरातून एक चुनरी घेऊन आली.

'बेटा ही चुनरी सलमाच्या निकाहसाठी आणली होती. सलमा नाही राहिली तर काय झालं हीच आहे माझी सलमा.'



असं बोलून तिने ती रीमावर ओढली आणि रीमाला घट्ट मिठी मारली. दोघीही नयनांश्रूत चिंब झाल्या.

'अल्ला करे तुम दोनो सलामत रहो.'

ते दोघे बाहेर पडले.

'रीमा आपण आता एकटे पडलो.'

'अंहं, आता आपण जगू या. एक दुसऱ्यासाठी जगू या. हा जीवनातला एकाकीपणा या आपल्या स्मृतींसह जगू या.'

अशी होती ही जगावेगळी कथा. एका जगावेगळ्या माणसाची.

■

# न्यायदेवतेचे आसू

मला ती अचानक दिसली. आम्ही स्तंभित झालो. एक गोड आश्चर्य आम्हा दोघांना सुखावून गेलं.

'ए वसू...! काय ग किती दिवसांनी....'

'अरे दिवस कुठले, वर्षांनी म्हण.'

'खरंच की ग... किती बदललीस. चक्क काकू दिसतेस!' मी.

'हा काळाचा महिमा आहे रे. आता तुझंच बघ न... शेवग्याच्या शेंगेसारखा होतास. पण आता मात्र पोटोबा ढमढेरे झालायस.' वसुंधरा काहीसं स्मित करून म्हणाली. ती खिदळली नव्हती. तिच्या चेहऱ्यामागे उदासीनता कुठेतरी लपली असावी. तिने ती कुशलपणे लपवली.

'तू काय करतोस?'

'मी ए.डी.जे.'

'म्हणजे ...?'

'अरे बापरे. क्षमा करा. मी आपल्याला एकेरी नावाने संबोधलं.'

'ए वेडाबाई, मी तुझ्यासाठी नंदूच. तू मला नेहमीप्रमाणे नंदी म्हणालीस तरी चालेल. अग मला वाटलं तू भेटताच माझ्या पाठीत धपाटाच घालशील.



किती वाट पाहात होतो मी!'

'कसली?'

'तुझ्या धपाट्याची.'

----०००----

वसू आणि मी दोघेही खोलवर भूतकाळात शिरलो. वसू म्हणजे माझी रूपारेल कॉलेजची मैत्रीण. एक चालतं बोलतं चैतन्य. तिची भाषेवर हुकूमत होती. प्रगल्भ विचारांची ती मलिका होती. शब्द तिच्या इशाऱ्यावर नाचत होते.

वक्तृत्व स्पर्धेत वसूची एंट्री टाळ्यांच्या कडकडाटात होत असे. कितीतरी शील्ड तिने कॉलेजसाठी पटकावली. प्राध्यापकांची लाडकी. प्रत्येकाला हवीहवीशी वाटणारी तिची दिलखुलास मैत्री. आमच्या पाठीत धपाटा पडला की समजायचं, वसू मागून आली. किती लोभस होतं ते व्यक्तिमत्त्व!

----०००----

आम्ही दोघेही आमच्या वर्तमानात परतलो. वसूमधला बदल मला जाणवला. एरव्ही खिदळणारी वसू स्मितहास्याला आज पोरकी झाली होती. जीवनाचा बोझ खांद्यावरून वाहताना ती थकलेली दिसत होती. तिच्या चेहऱ्यावर मला गांभीर्याचे सावट दिसले.

काहीशा खिन्न आणि जखमी स्वरात ती म्हणाली, 'तू मोठा जज्ज झालायस न, मग मला न्याय देशील?'

वसूचा प्रश्न मला खोलवर रूतला. मी म्हणालो, 'इज समथिंग रॉंग?'

वसूने एक दीर्घ निःश्वास टाकला.

मी वसूला घरी येण्याचा आग्रह केला. रविवारच्या सुट्टीचा दिवस निश्चित झाला. मी तिला म्हणालो, 'तुला पाहून सुरभी खूष होईल.'

'ही सुरभी कोण?'

'माझी बायको.'

'कशी आहे रे ती दिसायला?'

'तू आल्यावर बघ. नक्की येशील नं? मी वाट पाहीन.'

'बाय'

'बाय...'

----०००----

मी घरी आलो. सोबत होत्या वसूच्या आठवणी. किती उमदं होतं तिचं व्यक्तिमत्त्व. तारुण्याचा सदाबहार. डोळ्यात निळीशार रंगछटा. कुरळ्या केसांच्या तिच्या भुरभुर उडणाऱ्या केशबटा. निरागस सौंदर्य!

मला आठवतंय, मी आणि वसू कँटीनमध्ये चकाट्या पिटत होतो.

मी आवंढा गिळून तिला म्हणालो, 'ए वसू, तू मला खूप आवडतेस.'

'तू पण मला खूप आवडतोस.' किती सहज म्हणाली ती!

'मग माझ्याशी लग्न करशील?'

'ए शहाण्या, तू मला आवडतोस पण एक मित्र म्हणून... आणि काय रे, तुझे वय काय? अठरा, एकोणीस? अरे या वयात पुस्तकांवर प्रेम करायचं असतं, अभ्यासावर करायचं असतं.

हे बघ नंदी, मी या घडीला लग्नाचा विचार नाही करू शकत. माझ्यावर आईबाबांची जबाबदारी आहे. मी तुझ्याकडे जोडीदार म्हणून कधीच पाहिले नाही. अरे आपली मैत्री किती सोज्वळ आहे. निर्मळ आहे. एक गोष्ट लक्षात ठेव मित्रा, वैवाहिक जीवनात नाही म्हणायला वासनिक अंश असतो. दोस्तीचं पावित्र्य त्यापेक्षा कितीतरी श्रेष्ठ आहे.'

वसूची फिलॉसॉफी माझ्या विचारांना आव्हान होतं...

----०००----

वसूने मला नकार दिला याचं शल्य मला बरेच दिवस टोचत होतं. विचारांती पटलं की मी त्या फुलराणीच्या लायक नव्हतो. मी माझ्या स्वप्नांना दूरवर जोजवून आलो.

मुंबई युनिर्व्हसिटीमध्ये वसू बी.ए.ला पहिली आली. ती माझ्या आयुष्यात धूमकेतूसारखी आली आणि गेलीसुद्धा. तिचा कॉलेजमध्ये जाहीर सत्कार झाला. कौतुकाने सारा परिसर गुंजला.

वसूच्या बाबांची पुण्याला बदली झाली. संपर्क तुटला. विस्मृतीच्या काळोखात वसू दिसेनाशी झाली.

मी एल.एल.बी. झालो. काही दिवस प्रॅक्टिस केली. संधी मिळताच ज्युडिशियरीत शिरलो.

----०००----

मी काहीसा अस्वस्थ होतो. वसूची आतुरतेने वाट पाहत होतो. तिच्या



डोळ्यांतील वेदना मला कण्हताना दिसल्या.

ती आली. कॉलेजमध्ये तिचं येणं झंझावाती होतं. आज एकेक पाऊल ती कष्टानं टाकीत होती. घामाने डबडबली होती. गहिऱ्या श्वासात धुमसली होती. सुरभीनं पाणी आणलं.

मी ओळख करून दिली.

'ही वसू, म्हणजे वसुंधरा आपटे आणि ही....'

'ही तुझी बायको. ब्युटीफूल!' वसू मधेच म्हणाली. सुरभी मात्र संकोचली.

चहापाणी आटोपल्यावर आम्ही दोघे माझ्या स्टडीमध्ये गेलो. मी वसूला सांगितलं, 'तू तुझं मन मोकळं कर. निःसंकोच होऊन बोल. मी तुझा मित्र आहे. तू नकार दिल्यानंतर मैत्रीच्या नात्याला मी अधिक जपलं.'

वसू खिन्न झाली आणि ओशाळलीसुद्धा.

'कुठून सुरुवात करू?'

'तू मुंबई सोडून गेल्यानंतर....'

'अरे आम्ही पुण्याला आलो. मला पुढे शिकायचं होतं. आईबाबांना मात्र माझ्या लग्नाची काळजी ग्रासत होती. मला एक प्रपोजल आलं.'

'कोण होता तो भाग्यवान?'

'सक्षम. सक्षम अधिकारी. आमच्या वेणुमामींच्या नात्यातला. एकटाच होता. आईवडील लहानपणातच गेले. एम.कॉम. केलं होतं त्यानं. बँकेत कॅशिअर होता. कोथरूडला एक फ्लॅटपण होता.

मी लग्नाला विरोध केला. आईबाबा काकुळतीस आले. नंदू मी विचार केला, माझ्या जीवनावर जेवढा माझा अधिकार आहे, तेवढाच आईबाबांचा पण आहे.'

'मध्यमवर्गीय कुटुंबातला हा नेहमीचा भावनिक संघर्ष,' मी अकारण मत व्यक्त केलं.

'असेल कदाचित. मी सक्षमला सांगितलं मला करिअर करायचंय म्हणून. तेव्हा तो हसून म्हणाला,

'बेगमसाहिबा, तुम्हाला कुणी अडवलंय? खुशा...ल करियर करा.'

प्रथमदर्शनी त्याचे विचार मला प्रगत वाटले. आमचं लग्न झालं. सुरुवातीचे नवलाईचे दिवस सुखात गेले.

बघता बघता आमच्या संसाराची तीन वर्षे उलटली. माझ्या करियरचा

विचार सक्षमनी सोयीस्करपणे टाळला.

सक्षमला मूलं हवं होतं. माझी कूस रिक्त होती. ऑफिसमधले लोक त्याला डिवचत होते. तो विचलित झाला. कधी नव्हे ते मी व्रतवैकल्य करू लागले.

एक दिवस मी विमनस्कपणे त्याला म्हणाले, 'सक्षम, आपण डॉक्टर तपासणी करून घेऊ या का?'

मोठ्या मुश्किलीने तो तयार झाला. आमची फर्टिलिटी टेस्ट झाली. रिपोर्ट चार दिवसांनी मिळणार होता. मी आतुरतेने वाट पाहत होते.

सक्षम रिपोर्ट आणायला गेला. तो आला. चेहरा उतरलेला होता. मी समजले काहीतरी अपशकुनी बातमी आहे. मी विचारलं, 'काय झालं?

'दुर्दैव!'

'म्हणजे?'

'तुझ्यात दोष आहे. तू कधीही आई होणार नाहीस.'

'अरे, काहीतरी इलाज असेल नं?'

'नो नेक्स्ट टू इंपॉसिबल.'

माझं जग कोसळलं. मी वांझ निघाले. हा निसर्गाचा मार सहन करणं असह्य झालं.'

----०००----

घरातल्या कटकटी वाढत गेल्या. अहोरात्र सक्षम तुटकपणे वागू लागला. संसाराचा गोडवा निघून गेला.

दरम्यान, सक्षम बँकेत ऑफिसर झाला. त्याच्या स्टेटसमध्ये फरक पडला. माझ्यासारखी मराठमोळी पत्नी त्याला शोभेनाशी झाली. सक्षमला क्लबचं वेड लागलं. अधूनमधून तो ड्रिंक्स घेऊ लागला. मी गुपचूप सहन करीत होते. नाईलाज होता.

एक दिवस मी त्याला अनाथ मूल दत्तक घेण्याचा सल्ला दिला. माझ्या मनाला विरंगुळा म्हणून. तो वसकन माझ्या अंगावर धावून आला. म्हणाला, 'लोक समजतील मी षंढ आहे. परत हा विचार मनात आणू नकोस.'

इथे त्याचा पुरुषार्थ आक्रस्त झाला. आमचं घर म्हणजे रणांगण झालं. त्याचं पिणं आता वाढलंय. तो कित्येकदा मला मारतो पण.'

'हे तू सगळं निमूटपणे सहन का करतेस?' मी संतप्त होऊन म्हणालो, 'अग यात तुझा काय दोष?'



'नसेल. पण माझ्या प्रारब्धाचा तर आहे.'

'हॉरीबल, स्ट्रेंज फिलॉसॉफी' माझ्या तोंडून नकळत शब्द निघाले.

----०००----

सक्षम आता आवाक्याच्या बाहेर गेलाय. बँकेत कुठल्यातरी प्रकरणात तो गोवला गेला. नोकरी जाण्याची नौबत आली होती. कशीबशी टिकली. त्याची पदावनती झाली. तो परत कॅशियर झाला. त्याचा स्वाभिमान ठेचाळला. सामाजिक प्रतिष्ठा ढळली. स्वतःचाच द्वेष करू लागला. लोकांच्या नजरा चुकवत होता.

काही क्षण वसू निःशब्द झाली. पाण्याचा ग्लास ढोसून म्हणाली, 'बरं का रे नंदू, तो मेडिकल रिपोर्ट चुकून माझ्या हातात आला. तो दोष माझ्यात नव्हता, त्याच्यात होता. त्यानी मला उगाच खोटं सांगितलं. ही गोष्ट त्याच्या मनाला खात असावी. तो अधुरा आहे, ही सत्यता तो स्वीकारत नव्हता.'

'वसू तू हे सगळं कसं सहन करतेस? तू घटस्फोट घे. मी तुला मदत करीन.'

'किती सहजपणे बोललास रे हे तू! माझा दुसरा नवरा सक्षमसारखाच निघाला तर?'

काय रे नंदू स्त्रीचं शरीर हे केवळ प्रयोगासाठी असतं? तिच्या मनाचा विचार का हा समाज करत नाही? तुझा हा घटस्फोट, हा एकच मार्ग आहे का?'

'वसू, तुझे सगळे मार्ग बंद झाले आहेत.'

'घटस्फोट म्हणजे कोर्टकचेऱ्या. समोरचा वकील अनेक प्रश्न विचारून माझ्या अब्रूचे धिंडवडे काढणार. माझ्या माराचे वळ एखादा डॉक्टर माझी पाठ उघडी करून पाहणार. मग ते वर्णन नयनमनोहर दृश्यासारखं कोर्टाला सांगणार. त्या स्त्रीच्या मानसिकतेवर काय परिणाम होतो, हे जाणते का तुझी न्यायपालिका?'

आत्तापर्यंत ज्या जोडप्यांना तुम्ही घटस्फोट दिलात, ते खरोखर सुखी झालेत का, याचा मागोवा तुम्ही कधी घेतलात का?

घटस्फोटानी शरीरं विभक्त होतात, मनं नाही. मनं जन्मभर एकमेकांत गुरफटलेली असतात. काय तुझा न्याय मला विस्मृती देऊ शकेल?

सक्षम जीवनाची लढाई हरलाय. त्याच्यात प्रचंड न्यूनगंड निर्माण झालाय. त्याची अवनती त्याला पदोपदी अपमानित करते. त्यात मी घटस्फोट घेतला तर तो कोलमडेल.

‘अग पण तो तुझा तो मानसिक छळ. अमानुष व्यवहार....’

‘हे तुझ्या कायद्याच्या भाषेचे शृंगार आहेत. व्यवहारात त्यांना काही किंमत नाही.’

‘मग तू काय ठरवलंयस?’

‘तेच तुला विचारायला आले होते. खूप वेळ झालाय. सक्षम येण्याची वेळ झालेय. मला निघायला हवं.’

‘अग पण ते जेवण?’

‘पुन्हा कधी तरी.’

वसू निघून गेली. एक अमिट स्मृतीची रेखा सोडून. एक अधुरा न्याय तिच्या पदरात होता; पण तिचा आशावाद दुर्दम्य होता. आज प्रथमच मी न्यायदेवतेला अश्रू ढाळताना पाहिले.

■



# हिरवी संध्याकाळ

मुंबई टाइम्सच्या पहिल्या पानावर एक फोटो छापून आला. बॅकग्राऊंडमध्ये गेटवे ऑफ इंडियाची कमान होती. एका महिलेच्या मांडीवर डोकं ठेवून एक वृद्ध झोपला होता आणि ती महिला त्याच्या केसांतून बोटे फिरवीत होती. त्या भावचित्राला शीर्षक दिलं होतं ‘ज्येष्ठांची हिरवी संध्याकाळ.’

सकाळी सकाळी पेपरातला तो फोटो भावेशने पाहिला आणि तो विचलित झाला. त्याने आपली पत्नी शुभदा आणि धाकटा भाऊ कमलेशला उठवले आणि तो पेपर दाखवला. त्या तिघांची जोरजोराने चर्चा सुरू झाली. आवाजाने विनया जागी झाली. विनयाची झोपमोड झाली.

विनयाची बेडरूम हॉलच्या पहिल्या मजल्यावर होती. आतूनच एक गोल जिना तिच्या बेडरूमकडे वळवला होता. विनया जिना उतरून खाली आली. म्हणाली, ‘बाळांनो, हा किलकिलाट कसला? असं झालं तरी काय?’’

कमलेशने तो पेपर आईच्या समोर धरला.

तो फोटो पाहून विनयाला आश्चर्याचा धक्का बसला. कमलेश म्हणाला, ‘आई, तुझ्याकडून ही अपेक्षा नव्हती. एका पब्लिक प्लेसवर तुझे हे चाळे! कोण आहे तो थेरडा? केव्हापासून चालू आहे तुझं हे अफेअर? तुझं वय

काय, आमचं वय काय. हा विचार नाही का शिवला तुझ्या मनाला? लाज वाटते तुला आई म्हणायची.'

विनया शांतपणे म्हणाली, 'कमलेश, तुला नाही का वाटत तू मर्यादा सोडून बोलतोयस? हेच संस्कार मी तुमच्यावर घडवले?'

'आई, हा संस्कार शब्द तुझ्या तोंडात शोभून दिसत नाही. किमान आज तरी तू या विषयावर बोलू नकोस.' कमलेश संतापून म्हणाला.

'राहिलं बाळा. यापुढे नाही बोलणार. चुकलं माझं.'

'आई, मी मधेच काही बोलू का?' शुभदाने विचारले.

'बोल बेटा बोल. निःसंकोच बोल.'

'आई माझं लग्न होऊन पाच वर्षे झाली. शम्भव आता तीन वर्षांचा झालाय. तुमच्या बेडरूममध्ये एक पेटी आहे. त्याला कुलूप आहे. ती पेटी उघडताना मी तुम्हाला कधीच नाही पाहिलं. मी तुम्हाला अनेकदा विचारलं, त्या पेटीत काय आहे. प्रत्येक वेळी आपण उत्तर देण्यास टाळलंत. तुमचं जे काही तिथे गूढ आहे, गूज आहे ते तुमच्या मुलांसोबत शेअर करावं, असं नाही का तुम्हाला कधी वाटलं?'

विनया खिन्नपणे हसली आणि म्हणाली, 'अग त्या पेटीत माझं भावविश्व आहे. भावविश्व सहजासहजी कुणाबरोबर शेअर नाही होत. पण मला वाटतं ती वेळ आता समीप आली आहे. तुम्हा सगळ्यांना त्या भावविश्वात सामावून घेण्यासाठी मला थोडासा वेळ द्या.

आणि हो शुभदा, आज काही कामानिमित्त मी बाहेर जाणार आहे. दोन-तीन दिवसांनी परत येईन, माझी काळजी करू नका.

मला कल्पना आहे तुमच्या मनात अनेक प्रश्नांनी गर्दी केली असेल. त्या प्रत्येक प्रश्नाचं उत्तर देण्याचा मी प्रामाणिक प्रयत्न करीन.

मला वाईट इतकंच वाटतंय, माझ्या मुलांचा विश्वास मी गमावून बसले. माझ्यातली आई आज दारुणपणे हरली.' विनया निघून गेली.

दुसऱ्या दिवशी रविवार होता. दुपारचे चार-साडेचार वाजले असतील. विनया अकस्मात घरी आली. चेहरा उतरलेला. डोळे सुजून लाल लाल झालेले. विनया शुभदाला म्हणाली, 'मी आता आंघोळ करून झोपणार आहे. रात्रीच्या जेवणाच्या वेळी मला हाक मार. नंतर तुम्हा सगळ्यांपाशी मी माझं मन मोकळं करणार आहे. तुमच्या मनात वादळलेल्या प्रश्नांना शांत करण्याचा प्रयत्न करणार आहे.'



साडेआठच्या सुमारास सारे डायनिंग टेबलवर एकत्र आले. शम्भवनी आजीला हाक मारली. 'ए आजी, तू जेवायला येतेस ना आम्ही वाट पाहतोय. लवकर ये.'

'आले हं बाळा', विनया खाली उतरून आली. 'शुभदा, मला थोडा ताकभात खायचा आहे. लिंबाचं गोड लोणचं आहे नं. ते थोडंसं वाढ आणि शक्य असेल तर एक पापड भाज.' जेवणं निमूटपणे झाली. खरं सांगायचं तर जेवणात कुणाचेच लक्ष नव्हते.

जेवण झाल्यावर शम्भव म्हणाला, 'ए आजी तू मला कुठली गोष्ट सांगणार आहेस?'

'बाळा, आज नं मी खूप दमली आहे. मी नं माझ्या सोन्याला उद्या मोठ्ठी गोष्ट सांगीन. पण आता मात्र तुला तुझ्या बेडरूममध्ये जायचं आहे.'

शम्भव हिरमुसला. म्हणाला, 'अग आजी मी कसा जाऊ झोपायला? तू माझी गुडनाईट पापी कुठे घेतलीस?'

विनयाच्या डोळ्यांत चटकन पाणी आलं. तिने शम्भवला जवळ घेतला. कुरवाळला. त्याची पापी घेऊन म्हणाली, 'गुड नाइट, स्वीट हार्ट.'

शम्भव गेल्यावर ते चौघे दिवाणखान्यात बसले. जीवघेणी शांतता होती. गहिऱ्या श्वासांचे आवाज अधूनमधून कानांवर येत होते.

विनयाने बोलायला सुरुवात केली. कुठलंतरी अनामिक दुःख तिच्या डोळ्यांत एकवटलं होतं. ती म्हणाली, 'बाळांनो, तुमच्या मनातल्या प्रश्नांना उत्तर देण्याआधी मी तुम्हाला माझी पार्श्वभूमी समजावून सांगणार आहे.

तुम्हाला माहीत आहे, माझा जन्म गिरगावात भटवाडीतल्या एका चाळीत झाला. आप्पा म्हणजे तुमचे आजोबा भिक्षुकी करत होते. मी तीन वर्षांची होते तेव्हा माझी आई देवाघरी निघून गेली. आई निघून गेल्यावर आप्पांनी दुसरं लग्न नाही केलं. तेव्हा आप्पाच माझी आई होती आणि बाबासुद्धा.

मी म्युन्सिपालिटीच्या शाळेत शिकत होते. मला आठवतंय माझी एक मैत्रीण होती वासंती दांडेकर. वासंती शेजारच्याच चाळीत राहायची. ती आणि मी शाळेत एकत्र जात होतो. शाळेतून येताना मी वासंतीच्या घरी उसंतभर बसत असे. मग आपल्या घरी येत असे. एक रिकामं घर माझी वाट पाहात असे आणि मला एकांतात कोंडून ठेवत असे.

संध्याकाळी वासंतीची आई तिची दारात वाट पाहात असे. वासंती घरी आल्या आल्या आईच्या पाठीवर बसून साऱ्या घरभर कांदे घ्या, बटाटे घ्या

असं म्हणत फिरत असे.

एक दिवस मी वासंतीच्या आईला म्हणाले, 'काकू, मला पण घ्या नं एकदा पाठीवर!' तेव्हा काकू म्हणाल्या, 'नको ग बाई तू पडलीस तर माझ्यावर येईल.' मी रडत रडत घरी आले.

बाळांनो, आसवांचं आणि माझं नातं दृढ होतं. माझ्या वर्गातल्या मुली जेव्हा आईविषयी बोलत तेव्हा मी अंतर्मुख होत असे.

माझं शैशव संपलं आणि मी प्रौढांग वयात पाऊल टाकलं. नियतीनं आपलं कार्य केलं. थोडक्यात मी वयात आले. या वेळी शरीरात होणारी स्थित्यंतरं मनात काहूर निर्माण करतात. अनामिक भीती हृदयाचा ठाव घेते. अशा वेळी मुलींना आईसारखी दुसरी सुंदर मैत्रीण नसते. मला ते भाग्य नव्हते आणि आप्पांकडे त्या भावना व्यक्त करणं शक्य नव्हते.

१९५७ साली मी एस.एस.सी. झाले. आप्पा म्हणाले, 'आता तू कॉलेजात जा.' आप्पांनी माझ्याविषयी एक सुंदर स्वप्न सजवलं होतं. भिक्षुकीत काही राम उरला नव्हता. आप्पांकडे माझ्या आईच्या चार सोन्याच्या बांगड्या होत्या. त्यातली पहिली बांगडी माझी फी भरण्यासाठी मोडली.

मी रूपारेल कॉलेजमध्ये बी.एस्सी.च्या पहिल्या वर्षाकरता प्रवेश घेतला. आमच्या वर्गात सुब्रतो मुखर्जी नावाचा विलक्षण हुशार मुलगा होता. आमच्या भिडे सरांचा अत्यंत लाडका. सुब्रतो ठाकूरद्वारला राहायचा. हळूहळू आमची मैत्री झाली. चर्नी रोड ते माटुंगा प्रवास आम्ही लोकल ट्रेनने करत होतो.

मला आठवतंय पहिल्या वर्षी गॅदरिंगला आम्ही 'तुझं आहे तुजपाशी' नाटक केलं होतं. नाटकात सुब्रतोने श्यामची आणि मी गीताची भूमिका केली होती. आमचं खूप कौतुक झालं. आप्पांच्या कानावर ही बातमी जेव्हा गेली तेव्हा ते अतोनात संतापले, म्हणाले, 'कार्टे, तुला ही थेरं करायला का कॉलेजमध्ये धाडलं?' त्यानंतर मी कधीही नाटकात काम केलं नाही.

बाळांनो, सुब्रतोविषयी मला काय वाटत होतं, हे मोजक्या शब्दांत सांगणं कठीण आहे. एक अनामिक ओढ आम्हाला खुणावत होती. आम्हाला एकमेकांची वाट पाहण्याची सवय लागली होती.

एका शनिवारी सुब्रतो मला म्हणाला, 'आपण कॉलेज संपल्यावर गेट वे ऑफ इंडियावर फिरायला जाऊ.' त्याला नाही म्हणणं मला शक्यच नव्हतं.

आम्ही गेट वे ऑफ इंडियाला गेलो तेव्हा सुब्रतोने माझा हात हातात घेतला.



तो कोवळा प्रथम स्पर्श मला शहारून गेला. स्पंदनाचा सरगम छेडून गेला. आजही तो क्षण मला बेसावधपणे गाठतो आणि मी क्षणभराकरता भान विसरते.

'मग तू त्याच्याशी लग्न का नाही केलं?'

कमलेश आता उतावीळ झाला होता.

'कारण ते नियतीला मान्य नव्हतं.'

'का?'

'या प्रश्नाचं उत्तर माझ्याकडे नाही आणि नियतीला प्रश्न विचारण्याचा अधिकार कुठल्याही मानवाला नसतो रे बाळा.'

आम्हाला एकमेकांच्या सहवासाची इतकी सवय लागली होती की दर शनिवारी गेट वे ऑफ इंडियाला जाणं, हा आमचा क्रम बनला. एक नारियल आणि दोन स्ट्रॉ हे पण आमचं ठरलेलं होतं. मावळत्या सूर्यानी आमच्या मनात घर केलं होतं. एकही शब्द न बोलून आम्ही एकमेकांना खूप काही सांगत होतो... अबोल स्पर्शामधून.

आमची कॉलेजची फुलपाखरी वर्षे भुर्रकन उडून गेली. बी.एस्सी.ला मी जेमतेम सेकंड क्लासमध्ये पास झाले. सुब्रतो साऱ्या युनिव्हर्सिटीमध्ये पहिला आला. मला आठवतंय आमच्याच कॉलेजचा सुधीर दीक्षित दुसरा आला होता.

मग एक दिवस सुब्रतो मला म्हणाला, 'मला नोकरी कुठेही मिळेल तेव्हा आपल्या लग्नाचा विषय तू आप्पांकडे काढ.'

माझी छाती दडपून गेली. एक दिवस आप्पांच्या समोर मी विषय भीतभीत काढला. आप्पांना राग अनावर झाला. ते रागाने लालबुंद झाले. म्हणाले, 'अग पोरी, मी संस्कारात कमी पडलो का ग? मी तुझ्या पाया पडतो, असं काही करू नकोस. आयुष्य चार दिवसांचं उरलंय. जिवाला घोर लावू नकोस. या उरान्त तू काही केलंस तर मी शेजारच्या बावडीत जीव देईन.'

आप्पा असे रिॲक्ट होतील याची मला कल्पना होती. सुब्रतोच्या घरीपण कडाडून विरोध झाला. मी सुब्रतोला म्हणाले, 'आपण पळून जाऊन कोर्टात लग्न करू या.' तेव्हा तो म्हणाला, 'नाही विनुराणी, आपल्याला त्यांचे आशीर्वाद हवे आहेत.'

लग्न पुढे ढकलण्यासाठी मी दोन वर्षांच्या नर्सिंग कोर्सला ॲडमिशन घेतली. सुब्रतोचे काका कॅलिफोर्निया युनिव्हर्सिटीत प्रोफेसर होते. त्यांनी त्याला उच्च शिक्षणासाठी तेथे बोलावून घेतले. सुब्रतो जाण्याच्या आदल्या दिवशी आम्ही गेट वे ऑफ इंडियाला गेलो. आम्ही काहीच बोललो नाही. जे

काही बोलायचे होते ते आमचे आसू बोलले. सुब्रतो जरी दूर गेला तरी आम्ही मनाने कधीच दुरावलो नव्हतो. आम्ही एकमेकांना दर पंधरा दिवसांनी पत्र लिहिण्याचा संकल्प केला. आमची स्वप्नं जी बोलून दाखवता आली नाहीत ती पत्रात शब्दरूपात सजली. जवळ जवळ दोन वर्षांचा काळ पिंपळपान वाऱ्यावर उडून जातं तसा निघून गेला. सुब्रतोला भलीमोठी स्कॉलरशिप मिळाली होती. फायनल परीक्षेची तयारी चालू होती.

आप्पा आता खंगले होते. वार्धक्याच्या खुणा त्यांच्या चेहऱ्यावर उभारून आल्या होत्या. भिक्षुकी बंद झाली होती. मला स्टायपेंड मिळत होतं. चरितार्थ कसाबसा चालला होता.

त्या सुमारास आमच्या दूरच्या मामींनी विश्वासचं म्हणजे तुमच्या बाबांचं प्रपोजल आणलं. 'पण काय ग आई, सुब्रतो तुला पत्र पाठवत होता, हे आजोबांना माहीत होतं?' भावेशनी विचारलं. 'नाही बाळा. ही पत्रं मी माझी एक मैत्रीण होती, तिचं नाव होतं मीना गानू. दादरला हरी निवासमध्ये राहायची. तिच्या पत्त्यावर ती यायची. आप्पांना त्याची जरासुद्धा कल्पना नव्हती.

शुभदा, तुझ्या प्रश्नाचं मी प्रथम उत्तर देणार आहे. त्या पेटीत काय आहे याची तुला उत्सुकता आहे नं? त्या पेटीत सुब्रतोची पत्रं मी प्राणापलीकडे जपून ठेवली आहेत. तिथे माझा भूतकाळ आहे. माझ्या भावविश्वाची तिथे बाग फुलवली आहे.

'आई, मला क्षमा करा. मी चुकले.'

'नाही बाळा. तिथे तुला परिस्थितीने चुकवले. आपण कुठे होतो बाळांनो? हं. विश्वासचं प्रपोजल.

विश्वास पोष्टात नोकरीला होता. त्याचं ऑफिस बोरीबंदरला होतं. त्याला आई-वडील नव्हते. मालाडला कोणाकडे तरी पेईंग गेस्ट म्हणून राहत होता.

आप्पांनी चौफेर विचार केला. मुलगा माहितीतला होता. सरकारी पक्की नोकरी होती. त्याची जागेची अडचण सुटणार होती.

आप्पांनी मला विश्वासच्या स्थळाचा विचार करावा अशी विनंती केली. ती विनंती कसली, करुणेची भीक होती. त्यांच्या क्षीणावलेल्या डोळ्यांत आशा अंकुरली होती. आप्पा म्हणाले 'तुझं लग्न पाहिलं की मी आनंदाने डोळे मिटेन.'

मी विचार केला. आप्पा माझी आई होती, आप्पा माझे बाबा होते. त्यांचे ऋणानुबंध फेडणे शक्य नव्हते. त्यांची अखेरची इच्छा पूर्ण करणं माझं कर्तव्य होतं. काळजावर दगड ठेवून मी विश्वासला होकार दिला.



मी सुब्रतोला तसं कळवलं. त्याची प्रतिक्रिया नेमकी काय होती, मला कळली नाही. माझ्या लग्नाच्या दोन दिवस आधी त्याचं अभिनंदनाचं पत्र आलं. सोबत २५ डॉलरचा चेक आहेर म्हणून आला. सुब्रतोनी लिहिलं होतं, आता तो अमेरिकेत स्थायिक होणार आहे. माझ्या मंगलसमयी संसारासाठी त्याने मनापासून शुभेच्छा दिल्या. बघता बघता माझा वर्तमान भूतकाळात परावर्तित झाला.

विश्वासच्या प्रथम भेटीत मी त्याला सुब्रतोविषयी सर्व काही सांगितले. त्याला सुब्रतोची ती सर्व पत्रं वाचायला दिली.'

'बाबांची रिॲक्शन काय होती?' कमलेशने विचारले.

'विश्वास म्हणाला, 'विनया तू अजूनही सुब्रतोशी लग्न करावंस. वाटल्यास मी तुला मदत करतो.'

मी म्हणाले, 'आप्पांच्या कबरीवर मला घरकुल नाही उभारायचं.'

'अग पण, तू भूतकाळात अडकून राहिलीस तर आपला वर्तमान खराब होईल त्याचं काय?'

'नाही विश्वास, माझ्या भूतकाळाची सावली मी वर्तमानावर नाही पडू देणार.'

आप्पांचा रोग बळावला होता. त्यांना लिव्हरचा कॅन्सर झाला होता. डॉक्टरांनी हात टेकले होते. आम्ही घाईघाईने एक दिवस कोर्टात गेलो, आप्पांनी माझ्या हातात माझ्या आईचं मंगळसूत्र काढून ठेवलं. म्हणाले, 'ही तुझ्या आईबाबांची आठवण जपून ठेव.'

आम्ही कोर्ट मॅरेज करून घरी आलो. चाळीत आमची एकच खोली होती. झोपण्याची पंचायत होती. आप्पांनी आपला बिछाना व्हरांड्यात टाकला. विश्वास म्हणाला, 'आप्पा तुमची प्रकृती नाजूक आहे. आमची काळजी नका करू. विश्वासनी आप्पांचा बिछाना स्वतः उचलून खोलीत नेला. विश्वासचा संयम मला खूप भावला.

दुसऱ्या दिवशी मी पहाटेस उठले. आप्पांसाठी चहा ठेवला. लवकर उठायची सवय होती त्यांना. मी आप्पांना हाक मारली. त्यांना गाढ झोप लागली असावी. त्यांच्या स्वप्नाची पूर्ती झाली होती नं.

मी जरा वेळाने परत हाक मारली. त्यांना हलवले. आप्पा हाक मारण्याच्या पलीकडे गेले होते. मी किंचाळले. आजूबाजूचे लोक जागे झाले. आप्पांनी आपले प्राण माझं लग्न पाहण्यासाठी राखून ठेवले होते.

आप्पांचं क्रियाकर्म विश्वासनी श्रद्धेने केले. पिंडाला कावळा क्षणाचाही

विलंब न करता शिवला. आप्पांचा जीव कुठेही अडकला नाही. हे पाहून मला खूप बरं वाटलं.

काळ पुढे सरकत गेला. मी संसारात रममाण झाले. विश्वाससारखा जोडीदार मिळायला भाग्य लागतं. मग एक दिवस भावड्या तुझी चाहूल लागली. मी आई होणार ही अनुभूती शब्दांच्या चौकटीत नाही मांडता येणार. नियतीने स्त्रीला दिलेली ती अनुपम भेट आहे. त्या गोड बातमीने आम्ही दोघेही वेडावलो होतो.

भावड्या, तू जन्मलास तेव्हा सशासारखा गोरापान होतास. निळेशार डोळे, मिस्कील हास्य. तू तीळ तीळ वाढत होतास. तुझ्या आठवणी आम्ही डोळ्यांत साठवून ठेवत होतो.

तू एक वर्षाचा झालास. तुझ्यामागे मागे धावताना माझी तारांबळ होत होती. एक दिवस तुझी कोवळी हाक 'आई' माझ्या कानांवर आली. मी तुला छातीशी घट्ट धरलं आणि आनंदाश्रूत चिंब भिजले.

भावड्या तीन वर्षांचा झाला आणि कमलेश पाठीला पाठ लावून आला. बलराम आणि कृष्णाची जोडी, आनंद चौफेर उधळत होती.

विश्वासला प्रमोशन मिळालं. त्याची बदली ठाकूरद्वार पोस्ट ऑफिसमध्ये झाली. तो ऑफिसला पायी येत जात होता. एक दिवस सेन्ट्रल सिनेमापाशी त्याला एका भरधाव टॅक्सीनं उडवलं. ॲडमिट केलं त्याला हरकिसनदास हॉस्पिटलमध्ये. पैसा अमाप खर्च झाला; पण उपयोगास नाही आला. विश्वास मला म्हणाला विनू मी गेल्यावर तुमचं कसं होणार ग? दोन्ही पोरं लहान आहेत. तू रागावणार नसलीस तर एक सांगू का?'

'सांग नं.'

'तू सुब्रतोचा पत्ता शोधून काढ. तो अविवाहित असेल तर त्याच्याशी तू लग्न कर. माझ्या आत्म्याला शांती मिळेल.'

'असं अभद्र काही बोलू नकोस. माझा माझ्या मंगळसूत्रावर पूर्ण भरोसा आहे.'

त्याच रात्री विश्वासची प्रकृती ढासळली. मला त्याची घरघर ऐकू येत होती. माझा हात त्याने छातीशी धरून ठेवला. त्याला काहीतरी बोलायचं होतं. शब्द ओठांत अडखळले. माझ्या पदरात वैधव्याची भेट घालून विश्वास अनंताकडे झेपावला.

बाळांनो, मला दुःख कुरवाळायला वेळ नव्हता. घरातला पैसा संपला होता. त्यात तुमच्या दोघांची जबाबदारी. मी हिमतीवर टाटा कॅन्सर



हॉस्पिटलमध्ये नर्सची नोकरी मिळविली.

कालप्रवाहाबरोबर आपण वाहत होतो. तुम्ही शिकलात, सवरलात, मोठे झालात. मोठ्या हुद्द्याच्या नोकऱ्या मिळवल्यात. खारसारख्या सबर्बमध्ये हा टुमदार बंगला बांधलात. खरंच तुमचं कौतुक आहे, विश्वासच्या आठवणी मी जपून ठेवल्या होत्या.'

'आई एक विचारू?' कमलेशनी विचारलं.

'तुला सुब्रतोची आठवण येत नव्हती?'

'नाही बाळा. मी तुझ्याशी खोटं बोलणार नाही. मी सुब्रतोला विसरू शकले नाही; पण त्याच्या आठवणींना एका मर्यादेपलीकडे येऊन दिलं नाही.'

परवाच्या दिवशी दुपारी तीनच्या सुमारास आपला फोन वाजला. तुम्हाला माहिती आहे तो कुणाचा होता? सुब्रतोचा. मी एक्साइट झाले. 'तू कुठून बोलतोयस? कसा आहेस? किती वर्षांनी माझी आठवण तुला आली?'

'अग तुझ्या प्रश्नांची तोफ थांबवशील का?'

'तू आधी माझ्या घरी ये. माझा पत्ता लिहून घे.'

'नाही विनू. आपण गेट वे ऑफ इंडियाला भेटायचं.'

'ओ.के. किती वाजता?'

'संध्याकाळी डॉट पाच वाजता.'

मी अर्धा तास आधी पोहोचले. कसा दिसत असेल सुब्रतो? काय म्हणेल तो? असे अनेक प्रश्न मीच मला विचारत होते. सुब्रतो संकेतस्थळी बरोबर पाच वाजता आला. ओढगस्त चेहरा, थकलेले डोळे. आम्ही एकमेकांकडे पाच-दहा मिनिटं बघत होतो. निःस्तब्ध निश्चल.

'विनू, आधी नारियल पाणी घ्यायचं का?'

'ऑफकोर्स.'

आम्ही एक नारियल पाणी आणि दोन स्ट्रॉ घेतल्या. मग गप्पा मारण्यासाठी जागा शोधली. 'मला पहिल्यांदा सांग, इतक्या वर्षांत तू माझ्याशी संपर्क का साधला नाहीस?' मी म्हणाले. 'प्रश्न दुसरा लग्न केलंस की नाही? तुझी बायको कोण आहे? टिपीकल बंगाली का अमेरिकन?'

'सांगतो, सांगतो, माझ्या विनूराणी.... आय एम सॉरी. त्या नावानी तुला हाक मारायला नको होती.'

'अरे ती हाक तीस वर्षांनी कानांवर आली, खूप बरं वाटलं.'

'मी तुझ्याशी संपर्क नाही ठेवला. अग, ज्या भूतकाळाला आपण निरोप

दिला होता, त्याला परत भेटण्यात काय अर्थ होता. दुसरं असं की तुझ्या आठवणींशी मी लग्न केलं होतं. मग आणखीन लग्न कशाला?'

सुब्रतो अविवाहित राहिला यावरून त्याच्या प्रेमाची इंटेंसिटी कळली. वाईटपण वाटलं.

'आई मला काहीतरी सांगायचंय. मर्यादा ओलांडून बोलतोय. क्षमा कर.' भावेश म्हणाला.

'बोल नं.'

'अजूनही तू सुब्रतोशी लग्न कर. आम्ही त्याला पितृस्थानी मानायला तयार आहोत.'

'नाही, माझ्या राजा. स्त्री म्हणजे भातुकलीची बाहुली नव्हे. कधीही लग्न लावा. कधीही मोडा. मी विश्वासच्या नावाचं मंगळसूत्र बांधलं आहे. मी त्याची पत्नी म्हणूनच सरणावर जाईन. तुमच्या भावना मी समजते. आपलं विषयांतर होत आहे. सुब्रतोने मला पन्नास लाख डॉलरचा एक ड्राफ्ट देऊ केला.

'हे काय?'

'विनू, मी अमेरिकेतील प्रॉपर्टी विकून इंडियात आलो आहे. आता मला कुणीही नातेवाईक उरले नाहीत. आई-बाबा गेले. काका गेले. मी एकटा पडलो ग. तुझ्याशिवाय या जगात जवळचं असं कुणी नाही.'

'अरे, पण हे पैसे तुझ्याच कामास येतील. अजून सारा वृद्धापकाळ जायचाय.'

'नाही विनू, आयुष्य आता काही क्षणांचं उरलं आहे. कुणीतरी मला आकाशातून साद घालतोय.'

'पण अशी निर्वाणीची भाषा का?' माझ्या डोळ्यांत चटकन पाणी आलं.

'विनू, मला हाडांचा कॅन्सर झालाय. बरगड्यापर्यंत पसरलाय.'

'मग अमेरिकेत इलाज का नाही केलास? इथे का आलास?

'तिथल्या डॉक्टरांनी ऑपरेशनला नकार दिलाय. इट्स अ गॉन केस. मी टाटा कॅन्सरला माझे पेपर्स धाडले. डॉ. पटेल कसेबसे ऑपरेशनला तयार झाले. वाचण्याची शक्यता फक्त एक टक्का आहे. मी असा विचार केला की मरायचंच असेल तर मी माझ्या मातृभूमीत का नाही? शिवाय तुला भेटण्याची उत्कट इच्छा होतीच.'

सुब्रतोचे डोळे पाणावले, खोकल्याची एक जोराची उबळ आली. तो पुरता थकलाय. म्हणाला,

'विनू तुझ्या मांडीवर दोन-चार मिनिटं झोपू का ग?'



त्याने माझ्या मांडीवर डोकं ठेवलं आणि डोळे मिटून घेतले. एक विलक्षण समाधान त्याच्या चेहऱ्यावर दिसत होतं. मी त्याच्या केसांत बोटे फिरवत होते. मला कळलेच नाही, त्या छायाचित्रकाराने आमचा फोटो कधी घेतला. कमलेश आता तुला काही विचारायचं आहे का?'

'नाही आई, तुझ्यावर अविश्वास दाखवला त्याचा आता मला मनःस्ताप होतोय. मला एक सांग, बाबा गेल्याचं सुब्रतोंना कधी कळलं?'

'अरे, तो मुंबई एअरपोर्टवर उतरला नं, तेव्हा माझी मैत्रीण शैला चिटणीस त्याला भेटली. तिने विश्वासच्या ॲक्सिडेंटबद्दल सर्व काही सांगितलं. सुब्रतोने खेद व्यक्त केला. म्हणाला तुझ्या ललाटी अकाली वैधव्य आलं हे ऐकून मी हादरलो.

आता बराच वेळ झाला होता. सुब्रतोला ॲडमिट व्हायचं होतं. आम्ही टॅक्सी पकडली आणि सरळ परळला हॉस्पिटलमध्ये गेलो.

रात्रभर सुब्रतोचं डोकं मांडीवर घेऊन मी होते. आमच्या डोळ्यातून अश्रूंच्या संततधारा वाहत होत्या. बाळांनो एक गोष्ट लक्षात ठेवा, पाप कधीही स्पर्शात नसतं!

सुब्रतो म्हणाला, 'विनू या जन्मी तू माझी होऊ शकली नाहीस; पण पुढल्या जन्मी माझी तू होशील का?'

'नक्की. मी तुझ्यासाठी पुढचा जन्म घेईन. घरात विरोध झाला तरी आपण लग्न करायचं.' माझ्या वचनांनी सुब्रतो सुखावला.

बाळांनो, मी सुब्रतोला दिलेलं वचन ऐकून तुम्हाला आश्चर्याचा धक्का बसला असेल. मी तुमच्या बाबांशी एकनिष्ठ राहिले. सुब्रतोच्या आठवणींना मर्यादा ओलांडू दिल्या नाहीत. तसं पाहिलं तर माझ्या तनामनावर सुब्रतोचा हक्क पहिला होता. नियतीने माझ्यापुढे दुभंगलेलं आयुष्य वाढून ठेवलं. हे जगणं खूप कठीण असतं, बाळांनो.

आज सकाळी सुब्रतोचं ऑपरेशन होतं. स्ट्रेचरवरून त्याला ऑपरेशन थिएटरमध्ये नेलं. टेबलावर ठेवताना एका बाजूने मी, दुसऱ्या बाजूने वॉर्डबॉयनी धरलं. माझ्या बाहूत त्याने डोकं ठेवलं. माझ्या गालावरून त्याने प्रेमाने हात फिरवला. टेबलवर ठेवण्याआधीच त्याने माझ्या बाहूत प्राण सोडला. मी परत एकदा विधवा झाले.'

'पण आई, सुब्रतोकाकांचे अंत्यसंस्कार करायचे असतील नं. मी करीन ते.' कमलेश म्हणाला.

'बरं वाटलं ऐकून हे राजा. सुब्रतोने देहदान केलं. बॉडी मेडिकल कॉलेजला अभ्यासासाठी दिली. म्हणून त्याचे अंत्यसंस्कार होणार नाहीत. पण तुम्ही दरवर्षी श्राद्ध करावं अशी माझी इच्छा आहे.

एक गोष्ट सांगायची राहून गेली. सुब्रतोने मला दिलेला पन्नास लाखांचा ड्राफ्ट मी टाटा हॉस्पिटलला डोनेशन म्हणून दिला.'

'आई, तुझा आम्हाला अभिमान वाटतो. तुला नको नको ते बोललो. आम्हाला क्षमा कर.' कमलेश कळवळून बोलला.

'तुमच्या मनात काही शंका असतील तर जरूर विचारा.'

कोणीही काहीच बोलले नाही. विनयाने तिघांना छातीशी धरले. त्यांचे मस्तक चुंबले आणि ती भरल्या डोळ्यांनी आपल्या बेडरूममध्ये निघून गेली.

सकाळी शम्भवची गडबड सुरू झाली. शाळेत जायला तो तयार झाला. त्याने विनयाला हाक मारली. 'ए आजी, तू झोपून काय राहिलीस. तुला माहीत आहे नं रोज शाळेत जाताना मी तुला नमस्कार करून जातो. अग मला शाळेला उशीर होतोय.'

विनयाकडून काही प्रतिसाद मिळाला नाही. मनात चर्र झालं. भावेश धावत वर गेला. दरवाजा बंद होता. त्याने खिडकीतून पाहिलं, विनया चिरशांत निजली होती. तिच्या छातीवर तिची डायरी होती. दरवाजा फोडून सगळे आत आले. विनयाची उशी चिंब भिजली होती. रात्रभर ती रडत असावी. पेटीचं कुलूप काढून टाकलं होतं. त्या डायरीतून दोन फोटो खाली पडले होते. एक होता तिचा आणि विश्वासचा आणि दुसरा होता सुब्रतोचा आणि तिचा.

तिच्या आणि सुब्रतोच्या फोटोमागे स्टॅम्प होता रेक्स स्टुडिओ, कबुतरखाना. दादर आणि तारीख होती १७ मार्च १९५८. तो दिवस विनयाचा वाढदिवस होता.

विनयाच्या छातीवर असलेल्या डायरीच्या शेवटच्या पानावर लिहिले होते 'आज माझ्या आयुष्याची हिरवी संध्याकाळ काळवंडली.'

भावेश कमलेशला म्हणाला, 'आपल्या आईचं मोठेपण आपल्याला कधीच कळलं नाही. आयुष्यभर ती दोन भावविश्वात कोंडली गेली.'

'खरं आहे दादा,' 'आई नावाचं पुस्तक वाचण्यासाठी जन्म अपुरा पडतो. जेव्हा ती जगातून निघून जाते, पुस्तकाचा अर्थ आपोआप कळतो.'

■



## सूरबाला

काही कामानिमित्त मी इंदूरला गेलो होतो. येताना अवंतिका एक्स्प्रेसमध्ये माझ्या समोरच्या सीटवर एक तीस-बत्तीस वर्षांची तरुणी बसली होती. ती यवना असावी असा माझा कयास होता. अत्यंत आकर्षक व्यक्तिमत्त्व. माझी नजर परत परत तिच्याकडे जात होती. एक पुस्तक काढून डोळ्यांसमोर धरलं, पण काही उपयोग झाला नाही.

कधी कधी दोन अपरिचित व्यक्तींमध्ये अशी ओढ का निर्माण होते ईश्वर जाणे. या आकर्षणाचं मनोविश्लेषण करणं कठीण आहे. मी विवाहित. सोळा वर्षांची मला एक मुलगी पूर्वी, पत्नी सुषमा अशा सुखवस्तू परिवारातला मी. माझं वागणं मलाच खटकत होतं. ही सभ्य माणसाची लक्षणं नव्हती. माझ्या मनात दडून बसलेला लेखक अस्वस्थ होता.

रात्रीचे आठ-साडेआठ होताच लोकांच्या खाण्याच्या गडबडी सुरू होतात. बाहेर काळोख चांगलाच पसरला होता. पावसाने थैमान घातले होते. हवेतला गारवा जाणवत होता. मला ती युवती थोडीशी बेचैन दिसली. तिच्याकडे खाण्याची व्यवस्था नसावी.

थोडासा निर्लज्ज, थोडासा घाबरून मी म्हणालो, 'आपण डबा आणला

नाही का?'

'नाही मी जेवून आले आणि थोडंसं तापसरीसारखं वाटतंय म्हणून खाण्याची इच्छा नाही. मी माझ्या डब्यामधून सँडविचचे दोन तुकडे तिला दिले. ती नको नको म्हणत होती. पण माझ्यातला लेखक बेभान झाला होता. सँडविचेस देताना तिच्या हाताला स्पर्श झाला. स्पर्श झाला का मुद्दाम केला? ईश्वर जाणे. तिचं अंग मात्र तापलेलं लागलं.

माझ्यातलं स्त्री-दाक्षिण्य जागलं होतं. सँडविच खाल्ल्यानंतर मी तिला रतलामला गरमागरम चहा पाजला. माझ्या मताप्रमाणे गप्पा मारण्याइतकी आमची दोस्ती नक्कीच झाली होती.

मी विचारले, 'इंदूरला राहता का?'

'नाही मुंबईला.'

'मुंबईला कुठे?'

'गिरगावात.'

'काय नाव आपलं?'

'सूरबाला.'

किती सुंदर नाव हे! पण ही यवनी का मराठी? हे कोडे मनात घोळतच राहिलं. तिच्या नावात नावीन्य होतं. माधुर्य होतं. तिच्या लोभस रूपाला ते साजेसं होतं.

तिनं विचारलं, 'आपण काय करता?'

'मी लेखक आहे.'

माझ्यातला लेखक बोलत होता. त्याचा अहंकार बोलत होता. दोन-चार पुस्तकं काय लिहिली, आपल्याला साहित्यसम्राट समजत होता. झोपण्याची तयारी झाली, तिने एक पातळ चादर ओढली आणि ती आडवी झाली. थंडी चांगलीच जाणवत होती. जरा वेळानी सूरबालाला हुडहुडी भरली. माझ्या जवळच्या दोन क्रोसीनच्या गोळ्या मी तिला काढून दिल्या.

'आता एक घ्या आणि दुसरी जरा वेळानी.'

मला झोप काही आली नाही. सारे लक्ष समोरच्या बर्थवर टिकले होते. थंडीचा मारा सहन होत नव्हता. मी माझी शाल तिला पांघरली. बोरिवली येताच लोकं जागी झाली.

ती उठली आणि ओशाळून म्हणाली, 'तुम्ही हे किती माझ्यासाठी केलंत!'

'नाही हो, हे मी माणुसकीच्या नात्याने केलं.' माझा माणुसकीचा मुखवटा बोलत होता. ती मला शाल परत देत होती; पण मी मना केलं.

'मुंबई सेंट्रल आल्यावर पाहू' माझा आणखीन एक उमाळा.

सूरबालाचा ताप चांगलाच चढला होता. तिला धड चालता पण येत नव्हतं. तिचे पाय थरथर कापत होते. तिला तोल सावरत नव्हता. आता मात्र सगळे निर्बंध सोडून मी सूरबालाला पकडले. खरं सांगतो, ती एक आजारी व्यक्ती यापलीकडे काहीही भावना माझ्या मनात नव्हती.

मी टॅक्सी केली आणि सरळ तिला डॉ. प्रवीण मेहतांच्या घरी घेऊन गेलो. प्रवीण माझा जिवलग मित्र. प्रवीणने सूरबालाला तपासलं. ती काय करते? केव्हापासून ताप आहे? अशा अनेक प्रश्नांची उत्तरं सूरबाला देऊ नाही शकली.

शेवटी प्रवीण मला म्हणाला, 'ही बाई कोण? तिचा तुझ्याशी काय संबंध?'

खरंच सूरबाला माझी कोण? तिचे नि माझं काय नातं? हे मलादेखील कुठं ठाऊक होतं? प्रवीणनी काही टेस्ट लिहून दिल्या. मी सूरबालाला घेऊन निघालो. ती मला घरी घेऊन जाण्यास कचरत होती, पण मी पडलो पक्का बेरड.

मी तिला म्हणालो, 'मी तुझ्या घरी येणारच. तुला अशा परिस्थितीत नाही सोडणार. तुझ्या घरी एक कप चहा घेईन आणि मग माझ्या घरी जाईन.'

सूरबाला कासावीस होऊन म्हणाली, 'नाही बाबूजी, मी वाईट चालीची आहे. तुमच्यासारख्या सज्जनाशी नाही दोस्ती करू शकत. आपण इथपर्यंत मला साथ दिलीत, मी तुमची आभारी आहे. यापुढे मैत्रीच्या सीमा नाही ओलांडता येणार.'

सूरबालाचे शब्द जिव्हारी लागले. मी हताश होऊन म्हणालो, 'तू हे काय बोलतेस?'

'सत्य ऐकण्याचे धैर्य आहे तुमच्यात?'

'हो' मी जिद्दीला पेटून म्हणालो.

'लेखकबाबू मी वेश्या आहे. जेव्हा माणूस आपल्या घराचा उंबरठा ओलांडून आमच्याकडे येतो, तेव्हा त्याच्या घरचे दरवाजे बंद होतात. आपण सांसारिक आहात. या जगात आपल्याला मान आहे, सन्मान आहे. हे सगळं धुळीला मिळेल. उद्या तुमची नजर तुमचीच घृणा करेल. तुमच्या वैवाहिक जीवनात वावटळ येईल.'

निमिषमात्र शांतता पसरली. माझ्यातला लेखक म्हणाला, 'अरे वेड्या आता माघार कसली? ते आता शक्य नाही. तो भ्याडपणा ठरेल. सूरबालाशी नातं तोडलंस तर माणुसकीला वैधव्य येईल.

मी निश्चयाने म्हणालो, ‘सूरबाला तू कोण आहेस याने मला फरक पडत नाही. तू माझी मैत्रीण झाली आहेस. आजारी आहेस. ही माझ्या मैत्रीची परीक्षा आहे. माझा माझ्यावर विश्वास आहे. तू याबाबत चिंता करू नकोस.

मी सूरबालाला घेऊन तिच्या घरी गेलो. ती गलिच्छ वस्ती. वातावरण थरकाप उडवणारं होतं. मी सूरबालाला सांगितलं की मी उद्या येईन. त्या सगळ्या टेस्ट करून घेऊ. सूरबालाच्या डोळ्यांत आसवांचा अभिषेक मी पाहिला. तिच्या मूक वेदना कण्हत होत्या, पण चेहऱ्यावर कृतज्ञतेचे प्रतिसाद उमटले होते. ती शाल परत करायला निघाली.

तेव्हा मीच तिला म्हणालो, ‘नाही सूरबाला, ही शाल माझी आठवण म्हणून जपून ठेव’

मी घरी आलो. सुषमा ऑफिसमध्ये नि पूर्वी कॉलेजला गेली होती. आंघोळ-पांघोळ झाली. जेवण फ्रीजमध्ये होतं. जेवून मी ताणून दिली. पूर्वी संध्याकाळी पाच वाजता आली, तेव्हा तिनं मला उठवलं.

‘डॅडीश्री आप मेरे लिये क्या लाये?’ पूर्वीचा हिंदीतून एक लाडिक प्रश्न.

‘हमारी नटखट मुलगी के लिये राजस्थानी सूट आणि आईसाठी माहेश्वरी साडी.’

‘ओह डॅडी सो क्यूट.’ सूट पाहून पूर्वी विस्फारीत मुद्रेने म्हणाली, ‘डॅड यू आर सिंपली ग्रेट.’ रात्री डायनिंग टेबलवर अवास्तव गप्पा झाल्या. मी कुठेतरी माझ्याच तंद्रीत हरवत होतो.

सुषमा म्हणाली, ‘तुला झालंय तरी काय?’

‘काही नाही ग अजून झोपेची खुमारी गेली नाही.’ मी उडवाउडवीचे उत्तर दिले.

रोज रात्री डायरी लिहिणे माझा नित्यक्रम होता. त्या दिवशी मी लिहिलं, ‘सूरबाला मला एका वेगळ्या वळणावर भेटली. तिच्यात एक अप्रतिम लावण्याचं प्रतिबिंब मी पाहिलं. सुंदर विचार आणि संस्कार यांचा संगम मी पाहिला. ती वेश्या आहे यावर विश्वास बसत नाही. तिचं सुसंस्कृत बोलणं, शालीन वागणं तिच्या व्यवसायाशी विसंगत होतं.

सूरबाला एक वेश्या आहे हे सत्य आहे. ती वेश्या का झाली हे एक कोडे आहे. मी या कोड्यात गुरफटत चाललो आहे. सूरबालाला विसरणं कठीण आहे.

माझ्यातला लेखक तिच्यात काय शोधतो? तो तिच्या वेदना पाहतोय का आपल्या कहाणीसाठी एक विषय? दुसऱ्या दिवशी सूरबालाच्या घरी गेलो.

‘या बाबूजी.’ तापात फणफणत ती बोलली. सूरबालाच्या डोळ्यांत कृतज्ञता तरळत होती.

ती करुणेने म्हणाली, ‘आपण किती माझ्यासाठी तसदी घेता? आपण माझे कोण लागता? या नात्याला काय नाव आहे?’

‘सूरबाला, समयपुरुषाने बांधलेल्या या नात्याला काय नाव आहे, हे मला पण माहीत नाही. काही नाती अनामिक असतात. मला वाटतं आपण निघावं.’

मी दिलेली शाल सूरबालानी ओढून घेतली. मी तिचा हात धरून पॅथॉलॉजिस्टकडे घेऊन गेलो. टेस्ट झाल्या. रिपोर्ट दोन-तीन दिवसांनी मिळणार होते.

सूरबालाच्या घरी गेल्यावर मी तिला म्हणालो, ‘काय ग सूरबाला, तू सुशिक्षित, सुसंस्कृत मग तू इथे कशी आलीस? माझ्याविषयी गैरसमज करून घेऊ नकोस. मला जिज्ञासा आहे. तू माझ्या मैत्रीला आव्हान आहेस.’

‘नाही नाही बाबूजी’ तुमच्याविषयी गैरसमज कसला? आपण सज्जन आहात, हे आपले डोळे सांगतात. वाणी बोलते. माणसाची पारख आम्हाला...’

पुरे आता, तू मला तुझ्या पूर्वजीवनाविषयी सर्व काही सांग.’

‘काय सांगू तुम्हाला बाबूजी. तशी मी राहणारी जुन्नरची. म्हणजे जुन्नरपासून तीस मैलांवर आमचं छोटंसं गाव. एका आदिवासी घराण्यात माझा जन्म झाला. सरकारचं साक्षरता अभियान जोरात चालू होतं. आबांनी म्हणजे माझ्या बाबांनी मला शाळेत घातलं. आबा शिकलेले नव्हते, पण सुसंस्कृत मनाचे होते. मोलमजुरी करून आपलं घर सांभाळत होते.

आबांची आयुष्यात एकच चूक झाली. मुलाच्या अभिलाषेत त्यांनी चार मुलींना जन्म दिला. मी आठवीत शिकत होते आणि श्रीधरपंत प्रभुणे यांच्याकडे घरकामाला होते. त्यामुळे मला जे काही संस्कार मिळाले ते त्यांच्या घराण्याचे. श्रीधरपंत म्हणजे साक्षात सरस्वतीचे रूप. संध्याकाळी परवचा, रामरक्षा, अथर्वशीर्ष त्यांच्या मुलांसोबत मी पण म्हणत असे. शाळेत ‘या कुन्देन्दुतुषार’ ही सरस्वतीवंदना रोज मीच म्हणत असे.

श्रीधरपंत गाव सोडून मुंबईला त्यांच्या मुलाकडे निघून गेले. जाताना मला पुढे शिकवावे असा सल्ला आबांना देऊन गेले. मी आठवीत शाळेत पहिली आली. पुढचं शिक्षण पैशाच्या अभावी शक्य नव्हते. माझा मानसिक आधार डळमळला होता.

इथपर्यंत आयुष्य कष्टमय; परंतु मानसिक समाधानाचं होतं. आबा आजारी पडले. आमची आर्थिक परिस्थिती अधिक बिकट झाली. चार

बहिणींचे पोषण दुरापास्त झाले.

गावच्या पाटलांनी आबांना मला जेजुरीला नेऊन देवदासी बनवावे असा सल्ला दिला. आबा त्याला म्हणाले, 'मी विचार करतो.'

मोठी मुलगी देवदासी झाली तर घरात सुबत्ता येते, अशी श्रद्धा आजही आदिवासी लोकांत प्रचलित आहे. आबांनी काळजावर दगड ठेवून निर्णय घेतला. मी खूप रडले. आबांना गयावया करून सांगत होते.

आबा कळवळून म्हणाले, 'पोरी हा निर्णय घेताना मला वाईट वाटतंय ग. तुम्हाला मी पोसू शकत नाही हे माझं दुर्दैव आहे. सावकारांनी पैशासाठी तगादा लावलाय. त्यांनी निरोप धाडलाय की तुला त्यांच्याकडे पाठवून द्यावे. याचा अर्थ तुला कळतो? तुझ्या बापाच्या वयाचा आहे तो.

मी विचार केला, कुणाला ना कुणाला तरी त्याग करायला हवाय. मी सगळ्यात थोरली. माझ्या चिमुकल्या बहिणींसाठी बलिदान करण्याचं मी ठरवलं. मी मुरळी होणार या कल्पनेने काळीज थरारले.

एका रात्री जागरणाचा कार्यक्रम ठरला. गावात पाच-सहा आदिवासी कुटुंबे होती. लोक एकत्र झाले. बायकांनी फेरा धरून गाणी म्हटली. लोकांनी ढोलताशांनी खंडोबाच्या गोंधळाचा कार्यक्रम केला. वरण-भात, पुरण-भरीताचा नैवेद्य दाखविला. गाव जेवणावळ झाली. आबा आणखीन खर्चात बुडाले. दुसऱ्या दिवशी मला पहाटे हळद लावून आंघोळ घातली. खणा-नारळाची ओटी भरली. मला नऊवारी लुगडं नेसायला दिलं. मला धड नेसायलापण येत नव्हतं. मग गावात छोटीशी मिरवणूक काढली. मग विदा होण्याचा क्षण आला. मी माझ्या तिन्ही बहिणींना कवटाळले. घरात रडण्याचा आक्रोश होता. माझी आई मूक होती. एका कोपऱ्यात उभी राहून पाहत होती.

मी तिला जाऊन मिठी मारली. तिच्याकडे शब्द नव्हते. होते फक्त विरहाचे आसू. वडील मंडळींना नमस्कार करून मी छकड्यात बसले. पाहत होते मी माझ्या हताश आई-आबांना, माझ्या हरवलेल्या बालपणाला, विरलेल्या स्वप्नांना.

माझं खंडोबाशी लग्न लावलं. देवदासींचे जीवन याविषयी न बोललेले बरे. माझ्यासमोर माझ्या भावनांची खांडोळी झाली होती. ही प्रथा ज्या धर्माच्या मक्तेदारांनी लिहिली, त्यांच्या मुलीवर हा प्रसंग ओढवला असता तर त्यांना या वेदना कळल्या असत्या. हा धर्माचा खेळ जीवघेणा होता.'

सूरबाला क्षणभर थांबली. तिचा घसा कोरडा पडला. तिने एक दीर्घ उसासा घेतला आणि ग्लासभर पाणी ढसाढसा प्यायली. तिची कहाणी हृदयभेदक होती. मानवी अत्याचाराची होती.

थोड्या वेळानी मी विचारले, 'तुझं नाव सूरबाला कुणी ठेवलं?'

'त्या पुजाऱ्यानी. माझा गळा गोड होता. तो मला गाण्याच्या बैठकीत गाऊन घ्यायचा.'

'मग तू जेजुरीतून बाहेर पडलीस कशी?'

'तीच आहे माझी कर्मकहाणी. त्या दिवशी गाण्याची मैफील रंगली होती. सुधाकर मुजुमदार त्या मैफलीत प्रमुख पाहुणा होता. त्याचे आजोबा म्हणे होळकर सरकारांचे कारभारी होते. मैफिलीत वारेमाप पैसे उधळीत होता. त्यांनी मला प्रलोभन दिले. मला भुरळ दिली. नाही म्हणायला मला पण या देवदासी जीवनाचा कंटाळा आला होता.

सुधाकरबरोबर मी इंदूरला गेले. जुन्या इंदुरात त्याचा प्रशस्त वाडा होता. सुधाकरचा स्वतःचा संसार होता. माझी हस्ती एका रखेलीची होती. मी देवळाच्या पुजाऱ्यापासून गरोदर होते. सुधाकरनी मला त्या अवस्थेत स्वीकारले होते.

थोड्याच दिवसांत मला मुलगी झाली. गोरी गोरी पान, गुलाबासारखी लाल लाल. प्रेमाने तिचं नाव लालपरी ठेवलं. तीच माझी लाली. विलासी लोकांकडे लक्ष्मी केव्हा येते आणि केव्हा जाते सांगणे कठीण. सुधाकर कर्जात गळ्यापर्यंत बुडाला होता. वाडा सावकाराकडे गहाण होता. विकण्याची नौबत आली. सुधाकरनी मला वेगळी व्यवस्था करायला सांगितली. याचा अर्थ होता माझ्याच भूतकाळात परत शिरणे. मला परत देवदासी व्हायचं नव्हतं.

सुधाकरनी मला वचन दिले. तो लालीला शिक्षण देईल. तिच्या संगोपनात कसर होणार नाही. आता परत त्यागाचा प्रश्न आला माझ्या पोटच्या गोळ्यासाठी. माझी एक दूरची मावशी कांदिवलीला राहत होती. मी तिच्याकडे जाण्याचे ठरविले.

लालीचा मी निरोप घेतला. लाली एखाद्या हरिणीच्या पाडसासारखी भेदरलेली दिसत होती. किती आशाळभूतपणे पाहत होती. रडून रडून तिचा चेहरा अधिक लाल झाला होता.

यापूर्वी मी मुंबईला कधीच आले नव्हते. मुंबई सेंट्रलला एका माणसाला विचारले, 'कांदिवलीला कसे जायचे?' तो म्हणाला, त्याला पण तिथेच जायचे होते. मी मनात म्हणाले, 'मला देवमाणूस भेटला. त्या देवमाणसाने

मला इथे कुंटणखान्यात विकलं. बाबूजी माझं आयुष्य इथेच संपलं. मी जगत होते लालीसाठी. ती मोठी होण्याची स्वप्ने पाहत होते. तिचं लग्न झाल्यावर उर्वरित आयुष्य नातवंडांना खेळविण्यात घालवणार होते; पण माझी स्वप्ने माझ्यासारखीच करंटी होती.'

सूरबालाचे जीवन अभिशपित होते. तिच्या चेहऱ्यावरचे भाव बघवत नव्हते. मी जडपावली घरी परतलो. भूक मरून गेली होती. मी डायरी लिहायला सुरुवात केली.

सूरबालाच्या व्यथेला शब्दांत व्यक्त करणे कठीण आहे.

ती वेश्या असली तरी काय झालं? तिचे माझे संबंध आत्मीय होते. आज तिच्यातल्या आईचे मला दर्शन झाले. तिच्या आसवांत भिजलेले मनोभाव मी पाहिले. लालीसाठी तिचा त्याग हे मानवतेचे अनुपम उदाहरण होते. वेळप्रसंग आलाच तर लालीला मी घरी आणीन. माझ्या पूर्वीचा दर्जा तिला देईन.

सूरबालाच्या वेदना माझ्या काळजात घर करून बसल्या. मी नात्याच्या अनामिक चक्रव्यूहात फसलो होतो. दोन-तीन दिवसांनी मी रिपोर्ट आणायला गेलो. माझी डायरी चुकून टेबलावरच राहिली. सुषमाने ती वाचली. इंदूरहून आल्यापासून मी अस्वस्थ होतो, हे तिच्या लक्षात आले होते. डायरी वाचून उलगडा झाला आणि ती संतप्त झाली. आपल्या नवऱ्याचे संबंध एका वेश्येशी आहेत, हे वास्तव कुठली स्त्री निमूटपणे सहन करेल?

सूरबालाचा रिपोर्ट आला. छातीत धस्स झालं. रिपोर्ट एच.आय.व्ही. पॉझिटिव्ह होता. सूरबालाला एड्सची लागण झाली होती. तिला हे कसं सांगायचं? ती आता थोड्याच दिवसांची सोबतीण होती. मला रडू कोसळले, पण ही वस्तुस्थिती लपवून ठेवली तर तिचे परिणाम अधिक गंभीर होतील. सूरबालाला अज्ञानात जगवायचं का वास्तवाने तीळतीळ मारायचं, हा यक्षप्रश्न माझ्यासमोर होता. संकटाला सामोरे जाणे हाच एक योग्य मार्ग होता. मी सगळा रिपोर्ट सूरबालाला समजावून सांगितला. गांभीर्याची ओळख पटवून दिली. तिने रिपोर्ट ऐकला.

ती स्थितप्रज्ञ झाली आणि म्हणाली, 'बाबूजी मला मृत्यूचे भय वाटत नाही. मी जे जीवन जगते आहे ते मृत्यूपेक्षा कितीतरी भयानक आहे. जन्मभर मी ग्रीष्माचा ताप सहन केला, आज मला मृत्यूचा शीतल वसंत मिळेल. मला वाईट वाटते ते लालीचं, ती बिचारी पोरकी होईल.' सूरबालाला हुंदके आवरेनासे झाले. ती भळाभळा रडू लागली. नकळत तिने माझ्या छातीवर डोके ठेवले. शब्द मूक होते. तिच्या वेदना, तिचे डोळे बोलत होते.

मी सूरबालाला विचारले, 'ही लागण तुला कधी लागली असावी?'

'चार महिने झाले असावेत. हा वारसा पण मला सुधाकरनीच दिला.'

'सुधाकरनी!'

'होय बाबूजी. सुधाकरला एड्स झालाय. चार महिन्यांपूर्वी मी लालीला बघायला गेले होते. सुधाकर माझ्याजवळ आला. मी नाही म्हणत होते. नको नको म्हणत असताना त्याने माझ्यावर बळजबरी केली. लालीवर केलेल्या उपकाराची ती किंमत होती. त्यांनी माझ्या जीवनाची सांगता केली.

काही क्षण निःस्तब्ध गेले. मी उठलो. काही न बोलता मी बाहेर पडलो. सूरबाला दरवाजात उभी राहून मला निरोप देत होती. मला मागे वळून पाहण्याचे साहस झाले नाही. मी उदास मनाने घरी परतलो. घरी येताच सुषमा माझ्यावर कडाडली.

'ही सूरबाला कोण? तिचा तुझा काय संबंध? माझ्यात तुला काय कमी आढळलं की तुला वेश्येकडे जावं लागलं? मला तुझी घृणा वाटू लागलीय.'

'सुषमा तुझा गैरसमज होतोय. माझ्यावर विश्वास ठेव. तू आता काहीही ऐकण्याच्या मनःस्थितीत नाहीस. मी तुला नंतर सविस्तर सांगेन.'

सुषमाने टोकाची भूमिका घेतली. माय-लेकींनी माझ्याशी अबोला धरला. वातावरण गढूळ झालं. मी घरात अपराध्यासारखा वावरत होतो. त्या दोघीही माझी नजर चुकवत होत्या. सुषमाने माझी डायरी वाचली हे मला रुचलं नाही. डायरी ही माणसाचं मनोगत असतं. इतक्या वर्षांच्या सहवासात सुषमाने मला ओळखलं नाही. घर म्हणजे विश्वासावर बांधलेला मनोरा. हा विश्वास जेव्हा संपतो तेव्हा घराच्या भिंती निर्जीव होतात आणि नात्याचा ओलावा संपतो.

मी सुषमाला समजाविण्याचा खूप प्रयत्न केला. ती ऐकून घेण्यास तयार झाली नाही. या वावटळात एक आठवडा केव्हा निघून गेला कळलं नाही. माझं मन सांत्वनाचं एकच साधन होतं, ती म्हणजे माझी डायरी. सूरबालाविषयी ज्या भावना बोलून व्यक्त करता येत नव्हत्या त्या मी लिहून ठेवत होतो.

न जाणे माझे पाय आज अचानक सूरबालाच्या घरी कसे वळले? सुषमाच्या भावनांना मी लाथाडत तर नव्हतो? नाही. मी माझ्याशी प्रामाणिक होतो. माझ्यातला लेखक अस्वस्थ होता. मी माझ्याच विचारांच्या गर्दीत

हरवलो होतो. सूरबाला घरी नव्हती. चार-पाच दिवस झाले ती कुठेतरी गेली होती. ती कुठे गेली असेल? तिने जिवाचं काही बरं-वाईट तर.... नको, तो विचार सहन नाही होणार. मी घरी परतलो. माझी हुरहुर असह्य होती.

घरातलं वातावरण आता किंचितसं निवळलं होतं. आम्ही एक दुसऱ्याशी व्यावहारिक बोलत होतो. एक दिवस अचानक पूर्वी सकाळी सकाळी माझ्या बेडरूममध्ये आली.

'बाबा पेपरातली ही बातमी वाचा.' ती धाप लागल्यासारखी बोलत होती.

'अग काय आहे बातमी?'

'तुम्हीच वाचा.'

बातमी होती, 'मुंबईच्या एका महिलेचं प्रेत इंदुरात सापडले. अहिल्या उद्यानात रात्री ही महिला मृतावस्थेत आढळली. तिचे वय अंदाजे तीस-पस्तीस असावे. पोलीस सूत्रानुसार तिचे नाव सूरबाला देवदासी आहे. तिच्या पर्समध्ये मुंबई ते इंदूर रेल्वेचे रिझर्व्हेशन तिकीट मिळाले. शिवाय काही एड्सची औषधे पण मिळाली. यावरून ती एड्सची रुग्ण असावी असा अंदाज वर्तवला जात आहे. शव पोस्टमार्टमसाठी महाराजा होळकर हॉस्पिटलमध्ये पाठविण्यात आले आहे. पोलीस तपास चालू आहे. मृताच्या अंगावर एक सफेद काश्मिरी शाल मिळाली. तिच्यावरच्या धोबी मार्कावरून या रहस्यमय प्रकरणावर प्रकाश पडेल असा पोलिसांना विश्वास आहे.'

बातमी वाचताच मन सुन्न झाले. डोळे पाणावले. मी विचार करू लागलो. लाली कुठे असेल? सुधाकरनी प्रेताचा ताबा का नाही घेतला? सूरबाला माझ्या जीवनातलं एक स्वप्न होतं, आलं नि गेलं. मी इंदूरला जाऊन लालीला भेटण्याचं ठरवलं.

दुसऱ्या दिवशी मला एक पत्र मिळालं. सूरबालाचं होतं.

श्रद्धेय बाबूजी,

चरणस्पर्श.

हे पत्र आपल्याला मिळेल तेव्हा मी या जगात नसेन. तुमच्यापासून खूप खूप दूर गेली असेन. मृत्यूच्या वसंतकुंजात. माझ्यासारख्या पतित स्त्रीला दिलासा दिलात. बाबूजी, तुमची माझी ओळख काही दिवसांपूर्वीची. हे अनामिक नातं रक्ताच्या नात्याला लाजवणारं होतं.

तुमच्यासारखा माणूस या दुनियेत मिळणं कठीण. एका वेश्येकडे वासनेनं न पाहणारा. माझं केवढं सौभाग्य आहे तुमची शाल मृत्यूसमयी माझ्या अंगावर आहे. मी माझं जीवन संपवतेय. माझ्याआधीच लाली मला सोडून गेली. होय बाबूजी माझी पोटची पोर गेली. सुधाकरनी तिला पण नाही सोडलं. त्या कोवळ्या पोरीवर त्याने बलात्कार केला. माझी लाली रात्रभर रडली. तो लांडगा तिला धीर धरायला सांगत होता. नीच. हा आघात लालीला सहन नाही झाला. तिने आपल्या हाताच्या शिरा ब्लेडने कापून घेतल्या. सकाळी मिळाले ते तिचे निष्प्रभ प्रेत.

हे सगळं मला हवेलीच्या वयोवृद्ध नोकराने म्हणजे रामूकाकांनी सांगितलं. बरं झालं लाली मेली. नाहीतर तीदेखील माझ्यासारखीच कुंटणखान्यात गेली असती. एड्सच्या रोगानी माझ्यासारखीच जीवनाशी झुंजत राहिली असती. मला आपल्यासारखा पाठीराखा मिळाला. तिला कोण मिळाला असता?

सुधाकरनी मला तार पाठवून बोलावून घेतलं. प्रेमभंग झाला म्हणून लालीने आत्महत्या केली असं सांगितलं. मला पाच हजार देऊ केले. बाबूजी लालीच्या जीवनाची किंमत फक्त पाच हजार रुपये! या जगात भेड-बकऱ्या महाग आहेत.

रामूकाका पोलीस कंप्लेंट करायला सांगत होते. मी नाही केली तक्रार. उद्या सुधाकरला फाशी झाली असती, पण काय माझी लाली परत आली असती? लालीचा चेहरा डोळ्यांसमोरून हटत नाही. देवानी त्या कळीला उमलण्याआधीच वर बोलावले. आता मी कोणासाठी जगू? सरलं, माझं आयुष्य सरलं. माझं जग मिटलं. सुधाकरचा एड्स बळावलाय. तो तीळ तीळ मरतोय. आमच्या माय-लेकींचा तळतळाट त्याला वेदनाच्या रूपात मिळालाय. हीच त्याला मिळालेली निसर्गाची शिक्षा.

पुढच्या जन्मी तुमचं दर्शन झालं तर मी स्वतःला धन्य समजेन. वहिनींना म्हणावं (एका वेश्येने तुम्हाला भाऊ म्हटलं तर चालेल ना?) की तुमचे पती साक्षात मर्यादापुरुषोत्तम राम आहेत. असे पती सगळ्यांच्याच नशिबी नसतात. मी इथूनच त्यांना नमस्कार करते. ते माणुसकीचा मसीहा आहेत.

तुमची मुलगी काय बरं तिचं नाव हं आठवलं पूर्वी. माझ्या लालीच्याच वयाची ती आहे. तिचं लग्न खूप थाटाने करा. तिला तिच्या आत्याचे आशीर्वाद.

आपली अभागी बहीण,

सूरबाला.

पत्र वाचून डोळे डबडबले. पत्र सुषमा आणि पूर्वीनेपण वाचलं. आता बोलण्यासारखं काहीचं उरलं नव्हतं.

सुषमा ओशाळली. सजल नेत्रांनी आणि हुंदक्यांनी माझी माफी मागत होती. पूर्वी तर माझ्या कुशीत झेपावली.

आसवांत चिंब होऊन म्हणाली, 'बाबा मी चुकले. मला क्षमा करा. तुम्ही किती महान आहात. मी तुम्हाला नाही ओळखू शकले.'

'असं नको बोलूस बाळा. खरं म्हटलं तर मी तुला आणि तुझ्या आईला खूप त्रास दिला. एक वादळ माझ्या जीवनात आलं आणि शमलंसुद्धा. तुमच्या दोघींच्या भावना दुखावल्या गेल्या. आता स्मृतीत उरली सूरबाला आणि ती लाली जिला कधीच पाहिली नाही. परत कधीही कुणाच्या आयुष्यात मी डोकावणार नाही.'

'बाबा असं तुम्ही का म्हणता?' पूर्वी भावनाविवश होऊन म्हणाली.

आता वादळ शमलं होतं. आम्ही तिघांनी सूरबाला आणि लालीच्या स्मृतींना विनम्र नमस्कार केला.

■■

सूरबाला ही वेश्या आहे, यावर विश्वासच बसत नाही. तिच्यावर झालेले संस्कार तिच्या डोळ्यांतून, तिच्या चेहऱ्यावरून झळकत होते. कुणी तिला या व्यवसायात ढकलले? काय होती तिची मजबुरी? नियतीचा हा निर्णय विचलित करणारा होता. आदिवासी लोकरीती आणि रुढींच्या वेढ्यात गुंफले आहेत. आबांनी सूरबालाला देवदासी करण्याचे का ठरवले? आबा अंधश्रद्धेला बळी पडले. सूरबालावर पुजाऱ्यांनी अत्याचार केले आणि सुधाकरने तिच्या कोवळ्या मुलीवर. हा दैवाचा थरारक हल्ला होता. सूरबालामुळे माझ्या घरात वादळ उठले. ते शमले; पण त्या मायलेकींचे प्राण वेचून.

॥ वेदान्तश्रीः ॥
प्रकाशन, पुणे